मराठी कवींची

# बोधमणिमाला.

ही

बाळकृष्ण अनंत भिडे, बी. ए.,

यांनीं गुंफिली

व

महादेव केशव काळे

यांनीं

मुंबई येथें

तत्त्वविवेचक छापखान्यांत छापून प्रसिद्ध केली.

---

किंमत ४ आणे.

मराठी कवींची

# बोधमणिमाला.



ही

बाळकृष्ण अनंत भिडे, बी. ए.,

यांनीं गुंफली

व

महादेव केशव काळे

यांनीं

मुंबई येथें

तत्त्वविवेचक छापखान्यांत छापून प्रसिद्ध केली.

---

किंमत ५ आणे.

# प्रस्तावना.

१. सांप्रत प्रचलित शिक्षणपद्धतीची धार्मिक व पौराणिक ग्रंथांशीं फारकत झाल्यामुळें व तींत मराठीचा मान अनेक कारणांनीं जात चालल्यामुळें, आमचा विद्यार्थिवर्ग स्वतःच्याच पूर्वजांच्या काव्यकृतीला पारखा झालेला आहे. सामान्य जनांचीही स्थिति या बाबतींत शोचनीयच झाली आहे. व्यवहारांत इंग्रजीचें प्रस्थ दिवसेंदिवस माजत जाऊन, मराठीचा सासुरवास वाढत आहे; हरिकीर्तन, पुराण, पोथीवाचन वगैरे पूर्व प्रकार हेळसांडीनें मागें पडून, त्यांच्या जागीं कोणत्याही नवीन संस्था उद्भवल्या नाहींत; भक्ति व श्रद्धा यांचा अंमल नष्ट होऊन, त्या ठिकाणीं संशय किंवा उदासीनता यांचा पगडा मनावर बसलेला आहे. या गोष्टींनीं पूर्व कवींचा परिचय मागें पडून, ओळखही विसरल्यासारखी होऊं लागली आहे. ही स्थिति सुधारण्याला एक उपाय हा दिसतो कीं मराठींतील प्रासादिक काव्यांच्या स्वस्त आवृत्त्या छापून व त्यांतील सुंदर सुंदर वेंचे काढून, ते विद्यार्थी व सामान्य वाचक यांच्या हातीं पडतील असा प्रयत्न करण्यांत यावा. याच दिशेनें प्रस्तुत प्रयत्न आहे.

२. काव्यग्रंथांतील वेंचे अनेक धोरणांनीं काढतां येण्यासारखे असतात. सृष्टींतील देखावे, मानवी स्वभाव, युद्धादि प्रसंग, सुंदर आख्यानें, हृदयंगम संवाद, प्रासादिक व प्रतिमाद्योतक रचना, शृंगारादि रसांचा उत्कर्ष, सामान्य नीति, ईश-भजन, संगीतादि प्रकार, अलंकारादि साहित्याचीं अंगें इत्यादि एक किंवा अनेक गोष्टींवर कटाक्ष ठेवून निरनिराळ्या तऱ्हेची निवड होण्याजोगी आहे. प्रस्तुत प्रयत्नांत मुख्यत्वें सामान्य व्यावहारिक नीति व धर्मनिष्ठा यांवर रोंख ठेविलेला आहे.

३. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास इत्यादि साधु कर्त्रींचे अभंग म्हणजे भक्तिरसाचे अखंड प्रवाह व नीतिरत्नांचीं अक्षय भांडारेंच होत. परंतु त्यांतील वेंचक उतारे देण्याचें काम अनेक विद्वज्जनांनीं पूर्वींच केलेलें आहे. यास्तव मराठींतील पद्यात्मक वाङ्मयाच्या त्या महत्वाच्या विशाल भागाला मुळींच स्पर्श केलेला नाहीं. प्रस्तुतचे सर्व वेंचे एकनाथ, शुभानंद, मुक्तेश्वर, श्रीधर, महीपति यांच्या ओंवीबद्ध ग्रंथांतून व वामनमोरोपंतांच्या काव्यांतून घेतले आहेत. साधुस्तव, सत्संग, नाममहिमा, नामरसायन, केकावली, सन्मनोरथराजी वगैरे मोरोपंती स्फुट प्रकरणें स्वतंत्र रीतीनें सबंधच वाचण्यासारखीं असल्यामुळें त्यांचा या पुस्तकांत समावेश केला नाहीं.

४. हे उतारे निवडण्याच्या कामीं रा. रा. बाळकृष्ण सीताराम जोशी, मुरूड-जंजिरा, यांनीं जें मनसोक्त साहाय्य केलें, त्यांबद्दल त्यांचे प्रेमपूर्वक आभार मानण्यांत येत आहेत.

५. अखेर वाचकांस एवढीच विनंति आहे, कीं—

प्रसादें चेतोऽब्जें विपुल फुलवीते रविसम,
प्रतापोत्कर्षत्वें तम शमविते भ्रांतिविषम, ।
जगद्बंधुत्वानें सरलवर, अन्याय खणिते,
दृढस्नेहानंदें शुचिरुचि वरा **बोधमणि** ते. ॥

मुरूड-जंजिरा,
१९ जून १९०५.

**बा० अ० भिडे.**

# विषयानुक्रम.


| विषयांक. | विषय. | पद्यसंख्या. | पृष्ठांक. |
|---|---|---|---|
| १ | धर्म... | १० | १–२ |
| २ | हरिनाममाहात्म्य. | ५८ | २–६ |
| ३ | श्रद्धा-भक्ति-भक्त. | ६२ | ६–१० |
| ४ | प्रेम... | १० | ११— |
| ५ | ईश्वरी क्षोभ... | १७ | १२–१३ |
| ६ | तीर्थवास. | ११ | १३–१४ |
| ७ | प्रपंच. | ४० | १४–१६ |
| ८ | चिंता. | २० | १७–१८ |
| ९ | माता. | २५ | १८–२० |
| १० | देहदोष. | ७ | २०–२१ |
|  | देहगुण. | १८ | २१–२२ |
| ११ | दारिद्य व याचना ... | ३४ | २२–२५ |
| १२ | श्रोतावक्ता ... | १९ | २५–२६ |
| १३ | संतांचा उपदेश व पुण्यकथा. | १७ | २६–२८ |
| १४ | यश, कीर्ति... | १६ | २८–२९ |
| १५ | परोपकार. ... | ४१ | ३०–३३ |
| १६ | पंडित. | ४६ | ३३–३६ |
| १७ | देवतुल्य सत्पुरुष. | १३ | ३६–३७ |
| १८ | संतमहिमा.... | ५३ | ३७–४१ |
| १९ | साधुच्छळाचें फळ.... | १० | ४१–४२ |

२० साधुरीति. ... ... ... ... ... ५१ ४३-४७

२१ राजमान्य. ... ... ... ... ... १८ ४७-४८

२२ मूर्खपण. ... ... ... ... ... ३२ ४८-५०

२३ उद्योग व आळस. ... ... ... ... २२ ५०-५२

२४ सद्गुरूचें लक्षण व माहात्म्य. ... ... ३३ ५२-५५

२५ गुरुदास्य. ... ... ... ... ... ६६ ५५-५९

२६ सुशिष्य. ... ... ... ... ... ४५ ५९-६२

२७ कुशिष्य. ... ... ... ... ... २५ ६२-६३

२८ षड्रिपु. ... ... ... ... ... २२ ६३-६६

२९ कामादिकांचा सदुपयोग. ... ... ... १४ ६६-६७

३० द्रव्यलोभ. ... ... ... ... ... ४१ ६७-७१

३१ स्थिर लक्ष्मी. ... ... ... ... १० ७१-७२

३२ विषयलोभ-तृष्णा-आशाळभूतपणा. ... ... ५९ ७२-७६

३३ ताठा-अभिमान- अहंकार. ... ... ... ४९ ७७-८१

३४ क्रोध. ... ... ... ... ... ४७ ८१-८४

३५ मोह. ... ... ... ... ... ६ ८४-८५

३६ विवेक. ... ... ... ... ... ७ ८५-८६

३७ पराक्रम. ... ... ... ... ... ३४ ८६-८८

३८ सत्य. ... ... ... ... ... २७ ८९-९०

## मराठी कवींची

# बोधमणिमाला.

## १. धर्म.

**एकनाथ :—** ओंवी.

धर्म तेथें शुद्धज्ञान । ज्ञान तेथें विज्ञान ।
विज्ञान तेथें समाधान । शांति संपूर्ण नांदे तेथें ॥ १ ॥

—एकनाथी भागवत.

**श्रीधर :—** ओंव्या.

धर्म तेथें सदा दान । दान तेथें जनार्दन । जनार्दन तेथें कमला येऊन । चिरकाल स्थिर असे ॥ २ ॥ कमला तेथें सुख विशेष । सुख तेथें सहज उल्हास । उल्हास तेथें महापुरुष । संतजन मिळती ॥ ३ ॥ संत तेथें वसे शांति । शांति तेथें वसे निवृत्ति । निवृत्ति तेथें निश्चिति । समाधान सर्वदा ॥ ४ ॥ समाधान तेथें समाधी । समाधी तेथें कैंची आधी । आधी नाहीं तेथें उपाधी । नसे मग तत्वतां ॥ ५ ॥

—पांडवप्रताप.

**मुक्तेश्वर :—** ओंवी.

स्वप्नप्राय संसार क्षणिक । धर्म तोचि सत्य एक ।
येर सर्वही माइक । दिसे तें जाणपां ॥ ६ ॥

—वनपर्व.

**वामन :—** श्लोक.

ऐश्वर्ये ज्ञान पाहे जगचि, तरि अहो! तेंचि वैराग्य आहे; ।
धर्माची मूर्ति ही हें; प्रभुयशाहि तयीं विश्व होऊनि राहे; ॥

माया गंगाच वाहे स्थिर चर अवघें श्रीहरीतोंचि साहे; ।
हें जाणे तो न मोहे क्रमविहित गुण स्वामिचे सा नमो हे. ॥ ७ ॥
ऐश्वर्य सामर्थ्य गुणें सुजाणा; । ज्ञानत्व बोधेंचि विराग जाणा; ॥
वैराग्यहेतुस्तव धर्मसिद्धी; । धर्मे यशःश्री अशि हे प्रसिद्धी. ॥ ८ ॥
अधर्म तो, जो करि बंधनासी; । तो धर्म कीं जो भवबंध नासी; ॥
करूनि सृष्ट्यादिकही विरागी । धर्मिष्ठ तो भक्त जनानुरागी. ॥ ९ ॥
सत्कर्म आणि समता सदयत्वरीती, । हा मुख्यधर्म निगम स्फुट हें करीती; ॥
वैषम्यनिर्दयपणाविण लोक सारे । झाला स्वयें धर्महि तो असा रे! ॥ १० ॥

—गीतार्णवसुधा.

---

## २. हरिनाममाहात्म्य.

महिपति :— ओंव्या.

नाम जाणावें सर्वकाळ । नलगे तोंडधुणें आंघोळ । नामधारक त्याच्याजवळ । तीर्थें सकळ राहती ॥ १ ॥ जप तप अनुष्ठानें । सर्वही घडती नामस्मरणें । नामस्मरणीं त्यासी न बाधती विघ्नें । जगज्जीवन निवारी ॥ २ ॥ विष घेतलें कैलासरमणें । तेव्हां सर्वांगाचें जाहलें दहन । गंगा मस्तकीं धारिली जाण । परी शीतळ तेणें नव्हेचि ॥ ३ ॥ मग अनुताप धरोनियां पोटीं । म्हणे व्यर्थचि वाउगी सकळ गोष्टी । राम राम उच्चारितां शेवटीं । शीतळ धूर्जटी जाहला ॥ ४ ॥ कुंटिणी सकळ पातकांची राशी । राघोबा म्हणतां शुकासी । देवें विमान पाठविलें तिसी । वैकुंठासी मग नेली ॥ ५ ॥ अजामिळ ब्राह्मण निश्चित । तो वृषलीशीं जाहला रत । पुत्रमिषें नारायण स्मरत । तोही त्वरित उद्धरिला ॥ ६ ॥ वाराणसी ही मुक्तिपुर । तेथें नाम उपदेशी विश्वेश्वर । तेणें जीवांचा होय उद्धार । अन्य विचार असेना ॥ ७ ॥

—संतविजय.

श्रीधर :—    ओंव्या.

या श्रीरंगाचें करितां स्मरण । यातुल्य तप दुजें आन । नसे शोधितां त्रिभुवन । परम पावन नाम देखा ॥ ८ ॥ आणिक अष्टादश पुराणें । बोलिलीं सत्यवती-हृदयरत्नें । परी नामाहूनि विशेष साधनें । सर्वथाही नव्हतीं ॥ ९ ॥ पापतल्लक्षण हस्ती । याची तोंवरी जाणिजे मस्ती । नामसिंहप्रतापकीर्ति । ऐकिली नाहीं जोंवरी ॥ १० ॥ ऐकतां नामसिंहप्रतापा । पळ सुटे मत्त मातंगपापा । लपावया न मिळे खोपा । गतप्राण होती तेव्हांचि ॥ ११ ॥ पाप जळावया समस्त । हरिनाम अग्नि धडाडित । क्षणें दुरितकाष्ठें जाळित । प्रताप अद्भुत न वर्णवे ॥ १२ ॥ नामाग्नीनें न जळे । ऐसें पाप कोणीं नाहीं केलें । वाल्मीकें बहुत पाप जोडिलें । परी नाहीं उरलें नामापुढें ॥ १३ ॥ गणिका आणि अजामिळ । इहीं दोष केले कल्होळ । परी नामाचें अद्भुत चळ । जाळी सकळ क्षणार्धें ॥ १४ ॥

—हरिविजय.

एकनाथः—    ओंव्या.

नामापासीं भक्तिमुक्ति । नामापासीं यश कीर्ति । नामापासीं विजयप्राप्ति । कर्मनिर्मुक्ति हरिनामें ॥ १५ ॥ नामापासीं नित्य निवृत्ति । नामापासीं नित्य शांति । नाम वंदिजे सर्वांमतीं । ब्रह्मप्राप्ति हरिनामें ॥ १६ ॥ जो सप्रेम स्मरे नाम । त्याअधीन पुरुषोत्तम । नामें संतुष्ट आत्माराम । भक्तकाम कृपाळू ॥ १७ ॥ विस्मरणें अपेशप्राप्ती । विस्मरणीं नित्य अपकीर्ति । विस्मरण स्वयें पापमूर्ति । नरकप्राप्ती विस्मरणें ॥ १८ ॥ नामस्मरण परधर्म । नाम निर्दाळी कर्माकर्म । नाम केवळ परब्रह्म । पुरुषोत्तम हरिकीर्ति ॥ १९ ॥ ज्याचे मुखीं नामस्मरण । विघ्न त्याचे वंदी चरण । कळिकाळ स्वयें आपण । नित्य नमन त्यासी करी ॥ २० ॥ स्मरणीं नाहीं द्वंद्वबाधा । स्मरणें नाशे सकळापदा । छेदोनियां द्वंद्वाचिया कंदा । परमानंदा पाविजे ॥ २१ ॥ नामापासीं विरक्ति शांति । नामस्मरण परम भक्ति । नामापासीं चारी मुक्ति । नामें निश्चिती परब्रह्म ॥ २२ ॥ नामासी नाहीं कर्मबंधन । नाहीं नामासी विधिविधान । अबद्ध नाम अतिपावन । नाम परिपूर्ण

परब्रह्म ॥ २३ ॥ नामें दूषण होय भूषण । नामें पापी अतिपावन । नाम स्मरत्या यम शरण । नाम परिपूर्ण परब्रह्म ॥ २४ ॥ नामासी नाहीं कर्मबंधन । वेगळ्या कर्मा नामस्मरण । अच्युतनामें कर्म पावन । हें स्मृतिवचन श्रुत्यर्थ ॥ २५ ॥ नामासी नाहीं अनाध्यावो । नामासी नित्य स्वाध्यावो । नाम परब्रह्म स्वयमेवो । नाम निर्वाहो सभाग्य ॥ २६ ॥ नाम चैतन्याचा मुढा । नाम परब्रह्माचा हुडा । ब्रह्म नामाचिया पुढां । नाचे घडघडा स्वानंदें ॥ २७ ॥ नामें नरकी उद्धरती । नामें स्वर्गस्थांसी मुक्ति । ब्रह्मादिक अमरपाति । जन्म वांछिती कलियुगीं ॥२८॥ कलियुगाची थोर ख्याति । नामासाठीं लाभे युक्ति । स्त्रियादि अंत्यज उद्धरती । नामकीर्ति दाटुगी ॥ २९ ॥ नामासी नाहीं स्नानबंधन । नामासी नाहीं विधिविधान । आसनीं भोजनीं शयनीं जाण । नाम पावन हरींचें ॥ ३० ॥ निदसुरा निजसेवेसी । नामस्मरण जयापासी । ब्रह्मादिक वंदिती त्यासी । चहुं मुक्तींसी माहेर ॥ ३१ ॥ नामें निर्मुक्त महादोषी । वोस वस्ती यमलोकासी । येथें मरती उपवासी । यमनियमेंसीं लंघनें ॥ ३२ ॥ नाम गजरेंचि निर्मुक्त । वही पाहे चित्रगुप्त । कोरीं पानें अवघीं तेथ । कर्मनिर्मुक्त हरिनामें ॥ ३३ ॥

—भावार्थरामायण.

वामनः—

## श्लोक.

नामें स्फुरे तनु समग्र मनांत जेव्हां, । मंदाकिनी पदनखांत दिसेल तेव्हां; ॥
व्यापूनि नाम असणार समस्त अंगा, । त्याची कसी सरि करी चरणांबुगंगा. ॥३४

—नाममहिमा.

हरिपण हरिनामें धातुमूर्तीस आलें, । हरिमय हरिनामें विश्व संतांसि झालें, ॥
भवभय हरिनामें साधकांचें पळालें, । वद, वद, वद, जिव्हे! रामनामें रसाळें. ॥३५
निगमहि हरिनामें गर्जती वर्णवर्णीं, । पतित तरति नामें आश्रमी आणि वर्णी ॥
हरिपदिं हरिनामीं जेविं मुद्रा सुवर्णीं; । जगीं कवण असा? जो नाममाहात्म्य वर्णी ३६
आकाश-अंत न कळोनिहि अंतरिक्षीं । आकाश आक्रमिति शक्त्यनुसार पक्षी; ॥
नामप्रतापहि यथामति याच रीतीं, । सीमा न पावति, तथापि मुनींद्र गाती. ॥३७
मोक्ष श्रुती वदति ज्यास गुणप्रसादें, । तो पावतो सगुण नामसुधानुवादें; ॥

कोण्या मिसें करुनि यो हरिनाम वाचे, । नेत्र प्रकाशति तयावरि माधवाचे. ॥ ३८
अजितनाम वदो भलत्या मिसें, । करि कृतार्थ अमोघसुधारसें; ॥
करुनि शाकहि भक्षिल औषधी, । न करि ते गुण, हें न घडे कधीं. ॥ ३९ ॥
न करुं पातक, निश्चय हा घडे । मन तथापिहि पापपथीं पडे; ॥
जरि धरी हरिनाम कवित्व हें, । अशुभही शुभ होइल चित्त हें ॥ ४० ॥
न कळतां हरिनामसुधा मुखीं । जरि पडे, जन होय तरी सुखी; ॥
जरि महत्व कळोनिहि वैखरी । 'हरि' ह्मणे, मग काय तया उरी ? ॥ ४१ ॥
विषय बुद्धिस होय रमापती । म्हणुनि यास्तव तद्विषया मती. ॥
विषय बुद्धिस ज्याकरितां हरी । परम उत्तम नाम अशापरी ॥ ४२ ॥

प्रायश्चित्तें बहुत वदती वेदवेत्ते तथापी ।
त्या त्या कर्में करुनिहि जरी शुद्ध होतील पापी ; ॥
'रामा ! कृष्णा ! मुरहर ! हरे !' या पदीं शुद्धि जैसी ।
प्रायश्चित्तें इतर न कधीं शुद्धि देतील तैसी ॥ ४३ ॥

कडुवट हरिनामें वाटती पापियाला । परि दवडुनि पापें, गोड होती तयाला; ।
मग विषयसुखाची नावडे त्यास वार्ता । म्हणवुनि न पुन्हां तो होय अन्यायकर्ता. ४४
करिं गदांबुज, अंबुदसांवळा, । कटितटीं तडिदंबर मेखळा, ॥
सतत षोडशवार्षिक कोंवळा, । हरि करी हरिनाम अजामिळा. ॥ ४५ ॥

—हरिनामसुधा.

**रामदास :—** **ओंव्या.**

स्मरण देवाचें करावें । अखंड नाम जपत जावें । नामस्मरणें पावावें । समाधान ॥ ४६ ॥ सुख दुःख उद्वेग चिंता । अथवा आनंदरूप असतां । नामस्मरणेंविण सर्वथा । राहोंच नये ॥ ४७ ॥ कोडें साकडें संकट । नाना संसार खटपट । अवस्था लागतां चटपट । नामस्मरण करावें ॥ ४८ ॥ चालतां बोलतां धंदा करितां । खातां जेवितां सुखी होतां । नाना उपभोग भोगितां । नाम विसरूं नये ॥ ४९ ॥ आधीं अवदसा मग दशा । अथवा दशेउपरी अवदसा । प्रसंग

असो भलतैसा । परंतु नाम सांडूं नये ॥ ५० ॥ नामाचा महिमा जाणे शंकर । जना उपदेशी विश्वेश्वर । वाराणसी मुक्ति क्षेत्र । रामनामें करूनी ॥ ५१ ॥ उफराट्या नामासाठीं । वाल्मीक तरला उठाउठीं । भविष्य वदला शतकोटी । चरित्र रघुनाथाचें ॥ ५२ ॥ हरिनामें प्रल्हाद तरला । नाना आघातांपासून सुटला । नारायणनामें पावन झाला । अजामीळ ॥ ५३ ॥ नामें पाषाण तरले । असंख्यात भक्त उद्धरले । महापापी तेच झाले । परम पवित्र ॥५४॥ परमेश्वराचीं अनंत नामें । स्मरतां तरिजे नित्यनेमें । नाम स्मरतां यमें । बाधिजेना ॥ ५५ ॥ नाम स्मरे निरंतर । तें जाणावें पुण्य शरीर । नाना दोषाचे गिरिवर । रामनामें नासती ॥ ५६ ॥ अगाध महिमा नवचे वदला । नामें बहुत जन उद्धरला । हालाहलापासून सुटला । प्रत्यक्ष चंद्रमौळी ॥ ५७ ॥ चहूं वर्णांस नामाधिकार । नामीं नाहीं लहान थोर । जड मूढ पैलपार । पावती नामें ॥५८॥

—दासबोध.

---

## ३. श्रद्धा—भक्ति—भक्त.

एकनाथ :—

### ओंव्या.

भक्तीपाशीं यश कीर्ती । भक्तीपाशीं शांति विरक्ती । भक्तीपाशीं ब्रह्मस्थिति । स्वानंदें वर्तती सर्व कर्मी ॥ १ ॥ भक्तीस विकला भगवंत । भक्ताचें उच्छिष्ट स्वयें काढीत । रणांगणीं घोडे धूत । शेखीं होत द्वारपाळ ॥ २ ॥ जेथें राहती भगवद्भक्त । तें भूमंडळ होय पुनीत । कीर्तनसुखें डुल्लत । जग उद्धरत त्याचेनि ॥३॥ आनंदें करिती हरिकीर्तन । नामासवें गर्जे गगन । श्रोतया वक्तयाचें अंतरक्षाळण । न लागतां क्षण पैं होय ॥ ४ ॥ क्षाळलेनि अंतरें । परमानंद अंतरीं भरे । चित्त चित्तपणा विसरे । न देखे दुसरें जगामाजी ॥ ५ ॥ जगाचे ठायीं विषमता । चित्तपणें भासवी चित्ता । तेणें श्रवण कीर्तन करितां । स्वयें भगवंता रातलें ॥ ६ ॥ तेणें अंतर सुखावे तत्त्वतां । विषम जगामाजी पाहतां । बुडाली विषमाची वार्ता । चिदाभासता सर्वत्र ॥ ७ ॥ जेथें दुजेपणासी भान । तेंचि

लाजेसि आपतन । हरपलिया द्वैतभान । लज्जा पूर्ण निमाली ॥ ८ ॥ उन्मत्ताचे-परी जाण । निर्लज्ज करी कीर्तन । तेणें कीर्तनें सदा आपण । करी कीर्तन ताल-छंदें ॥ ९ ॥ जो मोल वेचून मद्यासी। सर्वे सेवी विषय विलासी । तो विसरे देहभावासी । द्वैत त्यासी भासेना ॥ १० ॥ उन्मादरस विचित्र । मेळवूनि केले एकत्र । त्याचा केवढा बडिवार । क्षणें संसार विसरवी ॥ ११ ॥ सकळ रसाचें रसपान । जे गोडियेमाजी होती निमग्न । तो ब्रह्मरस सेविलिया जाण । संसारभान केविं उरे ॥ १२ ॥ ऐसे ब्रह्मरस महायोगें । जगीं मद्भक्त दाटुगे । कलिकाळातें जिणोनि वेगें । नामबळें जग उद्धरती ॥ १३ ॥ चारा घालोनि मुखाआंत । जेविं पक्षिणी पिलीं पोशित । तेविं आपुले निजभक्त । रक्षी भगवंत अहर्निशी ॥ १४ ॥ विघ्न नयेचि नामापाशीं । तें केविं ये भक्तापाशीं । भगवंत रक्षी अहर्निशी । विघ्न भक्तांसी निर्विघ्न ॥ १५ ॥ विघ्न करू ये छळणार्थ । विघ्नांचा आत्मा तो भगवंत । विघ्न निर्विघ्न होय तेथ । भूतें भगव-द्रूप भक्तासी ॥ १६ ॥ सर्व भूतीं भगवद्भाव । तेथें विघ्नासी कैंचा ठाव । विघ्नाविघ्नत्वा अभाव । विघ्न स्वयमेव देव झाला ॥ १७ ॥ यथासामर्थ्यें यथावित्तें । चित्तें भावार्थें जीवितें । सुख द्यावें प्राणिमात्रातें । हेंचि निश्चितें निजभजन ॥ १८ ॥ भलतेयासी भलते योनी । भलतेनि प्रकारें करुनी । सुख प्राणिमात्रालागोनी । द्यावें अनुदिनीं हेंचि भजन ॥ १९ ॥ मेळवूनि षोडशोपचार । प्रतिमा पूजितां साचार । स्वयें सुखावेना शंकर । तेवीं चराचर पूजिलिया ॥ २० ॥ मुख्य पूजेचें आयतन । प्राणिमात्रा सुखदान । बाह्य विधीचें प्रतिपाळण । प्रतिमा जाण लौकिक ॥ २१ ॥

—भावार्थरामायण.

महीपति :— ओंव्या.

ऐकूनि म्हणे जगज्जीवन । 'तूं सत्यचि बोललीस वचन । परी भक्तावांचून एक क्षण । मजकारणें कंठेना ॥ २२ ॥ मी अव्यक्त निराकार जाण । भक्तांलागून झालों सगुण । माझे भक्तांस वैकुंठस्थान । बैसावया निर्मिलें ॥ २३ ॥ माझिया

भाग्याचे वाटेकरी । निजभक्ताचि जाण अधिकारी । त्यांचिया जीवींचें झडकरी । मीचि एक जाणता ॥ २४ ॥ माझे जीवींचिया खुणा । भक्तावांचूनि न कळती जाणा' । ऐसें रुक्मिणीसी वैकुंठराणा । सद्गद होउनि सांगतसे ॥ २५ ॥ 'चातक वसे भूमंडळीं । परी त्याचें लक्ष मेघमंडळीं । कर्मालणी राहिल्या सरोवरीं । परी भास्करावरी मन त्यांचें ॥ २६ ॥ कीं धेनु चरत असतां डोंगरीं । तिचें चित्त वत्सावरी । किंवा मन ठेवोनि द्रव्यावरी । कृपण बाजारीं हिंडतसे ॥ २७ ॥ कीं कुंभ घेउनि शिरावरी । मोकळ्या हातीं चालती नारी । लक्ष ठेवूनि दुडियेवरी । लोकाचारीं बोलत ॥ २८ ॥ कां चित्त ठेवून पुष्पावर । मिलिंद आकाशीं करित गुंजार । तेवीं बाह्यात्कारें करूनि संसार । अंतरीं श्रीधर असावा ॥ २९ ॥ सर्व भावें विठ्ठल चित्तीं । रूप पहावें सर्वां भूतीं । रज तम टाकूनि निश्चितीं । सप्रेमचित्तीं असावें ॥ ३० ॥ असंग होउनी एकट । सत्वशीळ ज्ञानी सुभट । सप्रेमभक्ति एकनिष्ठ । तेचि श्रेष्ठ म्हणावे ॥ ३१ ॥ निजभक्त आवडती माझिया जीवा । भक्त ज्ञानियांचा विसावा । भक्त माझे सुखाचा ठेवा । असोंदे ठावा तुजलागीं ॥ ३२ ॥ माझिया भाग्याचें भूषण । निजभक्त असती सुजाण । भक्तचि माझें गुणनिधान । सर्वदा आधीन मी त्यांचे ॥ ३३ ॥ भक्तचि माझी यशकीर्ति । भक्तचि माझी सुखमूर्ति । भक्त भेटतां सकळ पूर्ती । मनकामना माझिया ॥ ३४ ॥ मज आणिक भक्तां वेगळिक । कल्पांतींही नव्हे देख । माझे भजनाचें निजसुख । भक्तचि एक जाणती ॥३५॥ मी भक्तांचें नाम घ्यावें । तयांचें रूप मनीं ध्यावें । भक्तसुख दृष्टीं पहावें । वेळोवेळीं निजप्रीतीं ॥ ३६ ॥ भक्तीं माझे चिंतावे चरण । त्यांनीं माझेच गावे गुण । निष्कामबुद्धि माझें भजन । तेचि करिती सर्वदा ॥ ३७ ॥ धर्म अर्थ काम मुक्ति चारी । देतां भक्त न घेती करीं । संसारओझें मजवरी । भक्त न घालिती सर्वदा ॥ ३८ ॥ मी भक्ताचें अंतर । भक्त सोयरे माझे निर्धार । मजहूनि भक्त उदार । दिसती चौसार मज दृष्टीं ॥ ३९ ॥ कीं पिपीलिकेचे मार्गानें । पिपिलिकाच चालूं जाणे । तेवीं वैष्णवांच्या मनींची खुण । भाविका-

वाचून कळेना ॥ ४० ॥ जे कूपामध्यें बेडूक रहात । ते काय जाणती पयोब्धीची मात । तेवीं गुरुभक्तांची खूण निश्चित । माया लोभियांस कळेना' ॥ ४१ ॥

—भक्तविजय.

'जैसा भाव आणि भक्ति सप्रेम । उपासक आणि नित्य नेम । तैसा निजभक्त आणि राम । देती क्षेम एकमेकां ॥ ४२ ॥ कां आयुष्य आणि सुधारस । साकर गोडी भिन्न नसे । कां वासरमाणि आणि प्रकाश । एकमेकांस मिळती॥४३॥ अब्जिनी आणि सूर्यकिरणें । माता आणि बाळक तान्हें । चंद्रचकोरांचें मिळणें । आनंदासी उणें मग काय ॥ ४४ ॥ मज गांजिलें नानारीती । तयांसी मोक्षपद दिधलें अंतीं । परी भक्तद्वेषियासि निश्चिती । अधोगती चुकेना ॥ ४५॥ कोणें प्रकारें भक्त वैष्णवां । त्रास माझ्या भक्तासि द्यावा । मग त्याचा माझा लागला दावा । वैरभाव न चुके ॥ ४६ ॥ जैसा चंद्र आणि शीतळपण । अमृत आणि स्वाद जाण । तेवीं देव आणि भक्त दोघेजण । एकत्रपणें असती ॥ ४७॥ नातरी तीर्थ आणि जळ । मुक्ता आणि त्यांचा ढाळ । तैसे देवभक्त समरस केवळ । नव्हेति वेगळे सर्वथा ॥ ४८ ॥ जैसा देव तैसेचि भक्त । यांसी भिन्न भेद नाहीं किंचित । जैसें अमरत्व आणि अमृत । यांलागीं द्वैत असेना ॥ ४० ॥ अवकाश आकाश जाण । वायु आणि चंचलपण । तैसे देवभक्त दोघेजण । नामाभिधानें वेगळालीं ॥ ५० ॥ गंगा भरोनि वाहतां त्वरित । परी बेटापासी दोन भाग होत । दोन सरिता लोकांसि दिसत । परि तेथें द्वैत असेना ॥ ५१ ॥ ते आदिअंतीं एकचि जाण । मध्यें प्रवाह दिसती दोन । दर्शनस्पर्शनें तत्समान । करी पावन जगासी ॥ ५२ ॥ तेवीं जगदुद्धारास्तव निश्चितीं । देव भक्त नामें धरिती । परी तयां भेद नाहीं चित्तीं । अनुभव संतीं घेतला ॥५३॥ दर्पणासमोर मांडिला आरसा । त्यांत न दिसे स्वरूपठसा । भक्तावांचुनि मी तैसा । सप्रेम आशा खुंटली' ॥ ५४ ॥

—संतविजय.

**मुक्तेश्वर :—** **ओंव्या.**

कृष्णचरणीं भावार्थ जया । तो प्रारब्धें नेलिया विषम ठायां ।
तेथें पावोनि संतोष जया । पूज्य होय सर्वांतें ॥ ५५ ॥

—आदिपर्व.

अकिंचन आणि दानशील । भक्तीनें ओपी स्वल्प जळ ।
तेणें दिधलें भूमंडळ । कनकाचळ दक्षिणे ॥ ५६ ॥

—वनपर्व.

**श्रीधर :—** **ओंवी.**

जाति कुळ विद्या धन । येथें सर्वथा नसे प्रमाण ।
जो भक्तिभावें असेल पूर्ण । तयाचे सोयरे हरिहर ॥ ५७ ॥

—जैमिनिअश्वमेध.

**मोरोपंत :—** **गीति.**

श्रद्धाचि करितसे हित धर्मांचें, जेविं माय तनयाचें; ।
जप, तप, मख, गुरुपूजा, मुख्या श्रद्धाचि आयतन यांचें ॥ ५८ ॥
श्रद्धेनें भजल्यातें पाषाणहि फलद होय तो, अज्ञ ।
जो, तो सद्गुरु होतो ; अश्रद्धेनें वृथा महा यज्ञ. ॥ ५९ ॥
स्पष्ट अबद्धहि मंत्र श्रद्धेनें जपतया जना फळतो; ।
जैसी श्रद्धा, तैसी सिद्धि, सुपरमार्थ हा बुधा कळतो. ॥ ६० ॥
ज्याचें मन सच्छ्रुतिमतपथ सोडुनि, दुष्पथीं कदा न रते; ।
पावति भगवंताच्या जाणुनि सद्भक्तिनें पदा नर ते. ॥ ६१ ॥
सद्भजनें पोसावें प्रेमचि, सधनें जसें स्वतुंद रसें; ।
वाटावें इतराचें, कामिजना परकलत्र सुंदरसें ॥ ६२ ॥

———

## ४. प्रेम.

श्रीधर :— ओंव्या.

प्रेमावीण कायसें ज्ञान । प्रेमावीण व्यर्थ ध्यान । प्रेमावीण जें गायन । व्यर्थ जैसें गौरियांचें ॥ १ ॥ प्रेमावीण व्यर्थ पूजा । कदा नावडे अधोक्षजा । प्रेमावीण अभ्यास सहजा । व्यर्थ सर्व विद्येचा ॥ २ ॥ एक नसतां प्रेमकळा । अवघ्या त्या विकळा । शरण न रिघतां तमाळनीळा । सकळ साधनें व्यर्थचि ॥ ३ ॥ स्त्री सर्व लक्षणीं सुंदर पूर्ण । परी पतिसेवेसी नाहीं मन । तिचें चातुर्य शहाणपण । व्यर्थ काय जाळावें ॥ ४ ॥ गळसरीवीण अळंकार । भूतदयेवीण आचार । कीं रविशशीवीण अंबर । तमें जैसें व्यापिलें ॥ ५ ॥ कीं गुरुकृपेवीण ज्ञान । कीं आवडीवीण भजन । कीं गृहस्वामिणीवीण सदन । व्यर्थ जैसें भणभणीत ॥ ६ ॥ कीं रायावीण परिवार । कीं नासिकेवीण कैसें वक्र । तैसें प्रेमावीण स्मरारिमित्र । कदाकाळीं न सांपडे ॥ ७ ॥

—हरिविजय.

महिपति :— ओंवी.

परी आवडीची ऐसी जाती । बाळकें मातेसी भलतेंच बोलती ।
परी जननीस त्याची न वाटे खंती । ऐकूनि तुष्ट ती निजलोभें ॥ ८ ॥

—भक्तविजय.

एकनाथ :— ओंव्या.

प्रेम तेथें भाव पूर्ण । प्रेम तेथें वैराग्य गहन । प्रेमें निरसे जन्ममरण । प्रेमेंविण ज्ञान वांझोटें ॥ ९ ॥ प्रेम तेथें उपजे भक्ति । प्रेम तेथें नित्य विरक्ति । प्रेम तेथें अढळ शांति । प्रेमळां मुक्ति वोळंगल्या ॥ १० ॥

—भावार्थरामायण.

## ५. ईश्वरी क्षोभ.

मुक्तेश्वर :— ओंव्या.

आपल्या अपकाराच्या घायीं । शल्य वाढलें ज्याचे हृदयीं । अडल्या लोटांगण त्याचे पायीं । ईश्वरक्षोभ या नांव ॥ १ ॥ आपुला अर्थ लोकांवरी बुडे । लोकांचें देणें अचूक घडे । वैरियासी वर्म सांपडे । ईश्वरक्षोभ या नांव ॥ २ ॥ लाभार्थ कष्टतां होय हानी । अवमान पाविजे पूजास्थानीं । सुहृत् प्रवर्ते शत्रूच्या गुणीं । ईश्वरक्षोभ या नांव ॥ ३ ॥

—आदिपर्व.

श्रीधर :— ओंव्या.

ईश्वर झालिया पाठमोरा । नसंती विघ्नें येती घरा । महारत्नें होती गारा । न पुसे कोणी तयातें ॥ ४ ॥ आपुलें द्रव्य लोकांवरी । बुडुनि जाय न लाभे करीं । ज्यांचें देणें ते द्वारीं । बैसती आण घालूनी ॥ ५ ॥ वैरियांकरीं सांपडे वर्म । आळस बहुत येउनी बुडे धर्म । विशेष वाढती क्रोधकाम । तरी देव क्षोभला जाणिजे ॥ ६ ॥ लाभाकारणें निघे उदिमास । तों हानीच होय दिवसें दिवस । पूज्यस्थानीं अपमान विशेष । तरी देवक्षोभ जाणिजे ॥ ७ ॥ सुहृद् अत्यंत द्वेष करिती । नसतेचि व्यवहार गळां पडती । सदा तळमळ वाटे चित्तीं । तरी देवक्षोभ जाणिजे ॥ ८ ॥ आपली स्त्री राज्य धन । शत्रू भोगूं पाहे आपण । देह व्याधिपीडित पूर्ण । तरी देवक्षोभ जाणिजे ॥ ९ ॥ विद्या बहुत जवळी असे । बोलूं जातां मति भ्रंशे । कोणी तयासी न पुसे । तरी देवक्षोभ जाणिजे ॥ १० ॥ ठेविली ठेव न सांपडे । नसतीच व्याधि अंगीं जडे । सदा भय वाटे चहूंकडे । तरी देवक्षोभ जाणिजे ॥ ११ ॥ वृद्धपणीं ये दरिद्र । स्त्री मृत्यु पावे गेले नेत्र । हेळसूनि उपेक्षिती पुत्र । तरी देवक्षोभ जाणिजे ॥ १२ ॥

—रामविजय.

महीपति :— ओंव्या.

अभ्यास केला जन्मवर । समयीं नाठवे प्रत्युत्तर । विकल्प चित्तीं उठती फार । तरी ईश्वरक्षोभ जाणावा ॥ १३ ॥ वैरियां सांपडे आपलें वर्म । त्यांसारिखेंच बोलती जन । चित्तीं संताप ये क्षणक्षण । तरी ईश्वरक्षोभ जाणावा ॥ १४ ॥ अन्नावांचून कुटुंबवत्सल । प्रवासीं करी तळमळ । घरीं दाता करी हळहळ । तरी ईश्वरी क्षोभ जाणावा ॥ १५ ॥ वृद्धपणीं गात्रें विकळ । पुत्र न घेती समाचार सकळ । कांता करीतसे तळमळ । तरी ईश्वरी क्षोभ जाणावा ॥ १६ ॥ बाळपणीं मरतां माता । तरुणपणीं निजकांता । वृद्धपणीं शोक होतां । ईश्वरी क्षोभ या नांव ॥ १७ ॥

—भक्तविजय.

---

## ६. तीर्थवास.

मुक्तेश्वर:— ओंव्या.

तीर्थीं न वसतां तीर्थवास । सत्यवंत नित्य निर्दोष । तीर्थीं वसतां पुण्यलेश । तीर्थें एका नेदिती ॥ १ ॥ मत्सर नैष्ठुर्य भूतद्वेष । भजनमार्गींचा उपहास । तीर्थें त्याचा घेती त्रास । कीटक देशीं त्या वसती ॥ २ ॥ इंद्रियनियमाचा व्यसनी । सत्य मधुर असे वाणी । अहंकार ज्याचिया मनीं । संचरेना सर्वथा ॥ ३ ॥ तो सकलतीर्थांचा धात्रा । तीर्थें करिती त्याची यात्रा । पादोदकालागीं पवित्रा । तीर्थें माथां वोढविती ॥ ४ ॥ तीर्थीं असोनि इच्छारहित । प्रतिग्रहा न घाली हात । यथालाभें संतोषभरित । तो तीर्थरूप जाणावा ॥ ५ ॥ परधनीं अंधत्व ज्याचिया नयनां । परस्त्री पाहतां क्लीबत्व मना । परापवादीं मूकत्व वदना । तो जनक जाण तीर्थांचा ॥ ६ ॥ मनइंद्रियनिग्रहकारी । तो गृहीं असोनि जान्हवी-तीरीं । तीर्थीं असोनि अनाचारी । तो कीटकवासी जाणावा ॥ ७ ॥ सत्यशील दृढवृत्ती । आत्मभावना सर्वभूतीं । क्रोध कधीं का नाढळे शांति । तो तीर्थीं सर्वीं सेविजे ॥ ८ ॥ सुबुद्धशील विद्यातीर्थीं । साधु सुस्नात सत्यतीर्थीं ।

कुलांगना लज्जातीर्थी । पवित्र होती जाणपां ॥ ९ ॥ काम क्रोध लोभ त्रयां । स्पर्श न करी जयाची काया । तो तीर्थवासी जाण राया । तीर्थें पाय वंदिती ॥ १० ॥ विष्णुस्मरण शिवस्मरण । दोघीं वसविलें ज्याचें सदन । तोचि तीर्थवासी जाण । तीर्थें चरण वंदिती ॥ ११ ॥

—वनपर्व.

---

## ७. प्रपंच.

**एकनाथः—** **ओंव्या.**

कांहीं अर्पावें भगवंता । अतिसंचितार्थ नये हाता । त्यावरी स्त्रीपुत्रांची सत्ता । स्वयें मागतां नेदिती ॥ १ ॥ अंतीं मागतां कांहीं नेदिति । शेखीं सन्निपात झाला ह्मणती । संचितार्थी तोंडीं माती । नागविती स्त्रीपुत्र ॥ २ ॥ म्हणती आतां हा मरेल । मरतां द्रव्यार्थ वेंचील । आम्हासी भिक्षेसी लावील । याचा बोल नायकावा ॥ ३ ॥

—भावार्थरामायण.

**महीपतिः—** **ओंव्या.**

त्याचा तुमचा संबंध नाहीं । आपुली सोय धरा कांहीं । चार काष्टें नदीप्रवाहीं । आलीं लवलाहीं वाहत ॥ ४ ॥ वेट खळाळ लागतां थोर । चहूंकडे जाती चार । कोणी कोणासी साचार । जन्मवर पुरेना ॥ ५ ॥ जिणें जन्म दिधला संसारीं । ते माता न पुरे जन्मवरी । भरतां आयुष्याची दोरी । पिताही धरी मोक्षपंथ ॥ ६ ॥ देवब्राह्मणसाक्ष अग्न । वेदोक्तमंत्रें लाविलें लग्न । तो भ्रतार पावलिया मरण । कांता रांडपण स्वयें भोगी ॥ ७ ॥ इतर बंधुवहीण चुलता । कन्यापुत्र गृहसंपदा । कोणी कोणाचें नव्हे तत्वतां । म्हणोनि रघुनाथा भजावें ॥ ८ ॥ जोंवरी असे संपत्ति वैभव । तंव माझें माझें म्हणती सर्व । दरिद्र येतां कोणाचा नव्हे । जाताति सर्व टाकूनियां ॥९॥ कामा येईल म्हातारपणीं । यास्तव मातापिता दोन्ही । प्रतिपाळती बाळपणीं । काया झिजवुनी आपली ॥ १० ॥ पाटीं बैसली जे रांड ।

तिसी वस्त्रेंभूषणें करितां गोड । आपल्यासी मरण येतां रोकडें । मग ते रडे केश देतां ॥ ११ ॥ कन्या भगिनीचें पडप । बोळवण न करितां साक्षेप । म्हणती मेला आमुचा बाप । चित्तीं कोप धरोनी ॥ १२ ॥ संसारओझें न घेतां शिरीं । बंधु म्हणती आमुचा वैरी । जोडा पोसावा कोठवरी । यास्तव बाहेरी घालिती ॥ १३ ॥ दरिद्र येतां आपणाकारणें । तरी उपहास करुनियां हांसती पिशुन । पुत्र म्हणती आम्हांकारणें । करोनि ऋण ठेविलें ॥ १४॥ ऋण द्यावया घ्यावयास तरी । पाठीं पोटीं येतात वैरी । हे तुझिया दुःखाचे वांटेकरी । कोणीच निर्धारीं असेना ॥१५॥ पोटीं संतान जरी नसे । तरी नवस पुरवितां होती क्लेश । होउनी मरतां संतानास । तरी दुःखशोकास कारण ॥ १६ ॥ वांचतां निघाला अवगुणी। वडिलांसीं भांडे वृद्धपणीं । तेव्हां दुःख वाटतें मनीं । म्हणती निःसंतानी तो बरा ॥ १७ ॥ एवं संसार दुःख मूळ जाण । केवळ इंगळाचें अंथरुण । येथें सुख मानूनि घेणें । तरी शतमूर्खपणें तो नर ॥ १८ ॥ ढेकणाचे बाजेवरी । चईन न पडे निमिषभरी । मुकुंडी मारुनि निजला तरी । कुसमुस अंतरीं सर्वदा ॥ १९ ॥ संसारीं असतां देव जोडे । ऐसें निश्चित जरी घडे । तरी शुकादिक कां होउनी वेडे । बैसती कडेकपाटीं ॥ २० ॥ मागुती सद्गुरु बोलती काय । शुक नळिकेवरी बैसला पाहे । त्यासी पडावयाचें वाटे भय । अधिकचि पाय गोंवीतसे ॥ २१ ॥ पंख असोनि आपणास । उडोनि जावें न सुचे त्यास । मग धरोनि नेतां हिंसकास । पिंजऱ्यांत असे जन्मवरी ॥ २२ ॥ नातरी पाषाणासी छिद्र पाडोनी लहान । तयामाजी घालितांचि चणे । माकड मूठ भरीतसे जाण । न निघे म्हणोनि चडफडी ॥ २३ ॥ तेव्हां दवैसी येउनी जवळा । साकळदंड घालिताति गळां । घरोघरीं हिंडविती त्यांजला । सलाम लोकांना करविती ॥ २४ ॥ शुकवानरांऐसे भले । प्राणी संसारीं गुंतले । आपआपणासीं बंधन केलें । जैसें त्वां धरिलें फांदिसी ॥ २५ ॥

—भक्तविजय.

श्रीधरः— ओंव्या.

भवाब्धि भरला परम तुंबळ । द्वैतभावाचा तटाक सबळ । माजी कुबुद्धीचे कल्लोळ । मोहजाळ असंभाव्य ॥ २६ ॥ मदमत्सर थोर आवते । कामक्रोधादि समस्त । आशा तृष्णा भ्रांती तेथ । मगरी थोर तळपती ॥ २७ ॥ लोभ मोह नक्र थोर । ममतेच्या लाटा अति दुर्धर । दंभ आणि अहंकार । विरोळे हे तळपती ॥ २८ ॥ अविवेक ही डांकिणी तत्वतां । अविद्या भ्रांति जळदेवता । पीडिती जीवां समस्तां । आशा तृष्णा कल्पना ॥ २९ ॥ ऐसा अगाध भवनिधि थोर । तेथें रामकथा जहाज सुंदर । शिल्पकार वाल्मीक ऋषीश्वर । तारूं तेणें निर्मिलें ॥ ३० ॥ नाना चरित्रें सुंदर । याचि कळा दृढ थोर । विवेक जोडून समग्र । अभेदत्व साधिलें ॥ ३१ ॥ साहित्य गटें लोहबंद । आनंदपद खिळे विविध । दृष्टांतदोर प्रसिद्ध ॥ ठायीं ठायीं आवळिले ॥ ३२ ॥ अर्थरस तेल निखिल । तेणें सांधे बुझिले सकळ । रसप्रसादस्तंभ विशाल । कीर्तीसी फडकतसे ॥ ३३ ॥ सप्तकांड सप्तखण । लोटीत भवप्रभंजन । निजबोध कर्णधार पूर्ण । सकळ सुजाण देखणा ॥ ३४ ॥ ज्ञान आणि वैराग्य भक्ति । हींच आवलीं आवलिती । या जहाजावरी तेच वैसती । अद्भुत ग्रंथीं पुण्य ज्यांचें ॥ ३५ ॥ राम नाम घोष थोर । हेचि यंत्राचे भडिमार । नादें जळचर समग्र । भयभीत पळताती ॥ ३६ ॥ ऐसें भवसागरीं तारूं थोर । गुरुकृपेचें केणें अपार । भरूनि मोक्ष द्वीपांतर । लागवेगें पाविजे ॥ ३७ ॥

—रामविजय.

संसाराहूनि अन्य सुख । कांहीं पुत्रा नाहीं देख । आहे म्हणती ते परम मूर्ख । पूर्ण अभागी ते जाण ॥ ३८ ॥ परमार्थ तो केवळ शूळ । त्यावरी पडावया कां उतावेळ । संसार मिष्टान्नाचा कवळ । कांरे मुखांतूनि काढिसी ॥ ३९ ॥ स्वर्ग तो गगनकल्हार । परमार्थ तो गंधर्वनगर । हरिभक्ति जाण तें मृगनीर । एक संसार खरा असे ॥ ४० ॥

—जैमिनिअश्वमेध.

## ८ चिंता.

श्रीधरः— ओंव्या.

जेवीं कांजी पडतां बिंदुमात्र । घट भरोनि नासे क्षीर । तेवीं सर्व सुखांचा संहार । चिंता करीत क्षणमात्रें ॥ १ ॥ जो चिंतार्णवामाजी पडला । तो परपारासी नसेचि गेला । माजी विश्रांति घ्यावया तयाला । मध्य बेट तें असेना ॥ २ ॥ जो चिंतावनामाजी भरला । तो भ्रांतीलासीनें ग्रासिला । तो दुर्गतीतें सहज पावला । नाहीं आला निजधामा ॥ ३ ॥

—जैमिनिअश्वमेध.

महीपतिः— ओंवी.

कीं चिंता उद्भवली मानसीं । तैं उपचार न सुचे मानवासी ।
सन्निध देखतां अगस्तीसी । भरतें सागरासी नये कीं ॥ ४ ॥

—भक्तविजय.

एकनाथः— ओंव्या.

चिंता संचरल्या शरीरीं । सुख नेदी तिळभरी । लागतां चिंतेची लहरी । सुरासुरीं कांपिजे ॥ ५ ॥ सुख नेदी राजभवन । सुख नेदी भोगायतन । दारापुत्रादि जन । सुख जाण न देती ॥ ६ ॥ सुख नेदी धनसंपत्ति । सुख नेदी सकळ संतती । सुख नेदी यशकीर्ति । चिंता चित्तीं प्रवेशतां ॥ ७ ॥ चिंतेनें नव्हे इहलोक । चिंतेनें प्राप्त नव्हे स्वर्गिक । चिंतेनें न साधे योगसुख । चितादाह देख भला नव्हे ॥ ८ ॥ परमानंदाचें वन समग्र । चिंतेनें जाळिलें चौफेर । चिंतेनें परमार्थाचें घर । निरंतर उद्वसे ॥ ९ ॥

—भावार्थरामायण.

दासोपंतः— ओंव्या.

चिंता पुरुषातें बंधन । चिंता जातीचें मरण । चिंता सुखाचें छेदन । दुःखदाती ॥ १० ॥ चिंता हृदयींचा रोगु । चिंता नाशी परम योगु । आंगीं लागला सुखभोगु । भोगूं नेदी ॥ ११ ॥ इंद्रियांतें करी शोषण । देहावरी नये मन । चिंता

भ्रमवी वन । नेदी विश्रांति ॥ १२ ॥ चिंता हृदयींचा अंधकारु । चिंता हा कृष्णु विखारु । चिंता नाशी तोची गुरु । संसारत्राता ॥ १३ ॥ बाह्यांतरीं व्याकुळता । पुरुषा आणी चिंता । चिंतासागरीं बुडतां । दुजें न पवे ॥ १४ ॥ दैन्य घडवी वदन । तटस्थ राहती करचरण । निमिषोन्मेषही नयन । विसरोनी जाती ॥ १५ ॥ कार्यातें सांडूनि करणें । उगींचि राहती जडपणें । न स्फुरती विषयज्ञानें । चिंतेकरितां ॥ १६ ॥ भक्षितां न कळे अन्न । न कळे बोलतां वचन । आइकतचि दोन्ही श्रवण । बधिर होती ॥ १७ ॥ आंगीं आदळलेंही न कळे । सुखदु:ख चिंताकाळें । मन इंद्रियां न मिळे । इंद्रियें अर्थां ॥ १८ ॥ अंगा खुपे शेज । गंधु न कळे जाणिज । डोळां देखिलें मनुज । वोळखेना ॥ १९ ॥ आगीवीण चिंता जाळी । सुखांशु अवघा गिळी । चिंतेऐसें भूमंडळीं । दुष्ट नाहीं ॥२०॥

—गीतार्णव.

---

## ९ माता.

श्रीधर:— **ओंव्या.**

मातेची आज्ञा सर्वथा । न मोडावी प्रमाण शास्त्रार्थी ।
संन्यास जरी घेतला तरी माता । वंद्यावी हे साचार ॥ १ ॥

—रामविजय.

कुरूप बाळ देखोनि । प्रीती न पाविजे जननी । जरी माता त्याचे अवगुण आठवील मनीं । तरी तें कैसें वांचेल ॥ २ ॥ अति उदार असे बलाहक । ज्यातें इच्छिती सकळ लोक । तो तुच्छ मानील जरी चातक । वांचणें केवीं घडे ॥ ३ ॥ पाहतां तो अमृतकर । जो क्षीराब्धीचा पुत्र । तो जरी तृप्त न करी चकोर । तरी तेणें कैसें वांचावें ॥ ४ ॥

—जैमिनिअश्वमेध.

एकनाथ:— **ओंव्या.**

स्वधर्मकर्मीं निपुण । दहा ब्राह्मण अति सज्ञान । एक आचार्य त्यांसमान । ऐसें महिमान आचार्याचें ॥ ५ ॥ दशआचार्यश्रेष्ठ कर्मप्रकृति । त्याहूनि पि-

त्याची अधिक शक्ति । पुत्रविक्रयीं का दूरी कायार्थी । नेमकत्वें निश्चिती पिता अधिक ॥ ६ ॥ दशआचार्यविशेषीं । गुरुत्वें गौरव पित्यासी । पित्याहूनि दशगुणेंसीं । गुरुत्वें मातेसी पूज्यत्व ॥ ७ ॥ गर्भधारणा पोषणेंसीं । मातेसी गुरुत्व विशेषीं । पृथ्वीपरीस मातेसी । पूज्यत्वासी गौरव ॥ ८ ॥ पिता जालिया पतित । पुत्रें त्यागावा निश्चित । माता झालिया पतित । पूज्यत्वें शास्त्रार्थ प्रतिपादी ॥ ९ ॥ पुत्र झालिया संन्यासी । अवश्य त्यागावें पितयासी । भिक्षा मागोनी मातेसी । पोसावें संन्यासी, विधिशास्त्रार्थें ॥ १० ॥ जें गोड लागे माउलिसी । तोंडींचें काढी ते वेगेंसीं । वोपी बाळकाच्या मुखासी । निजमानसीं स्नेहाळू ॥ ११ ॥ बाळातें बोलों शिकवी माता । तीपुढें तें वाचाळता । करितां सुखावे माता । परी सर्वथा क्षोभेना ॥ १२ ॥

—भावार्थरामायण.

**महीपतिः—** **ओंव्या.**

धरणी उवगली वृक्षासी । तरी ठाव नाहीं जावयासी । कीं मायेनें टाकितां बाळकासी । तरी कोण तयासी सांभाळी ॥ १३ ॥ कासवी न पाहे कृपादृष्टीं । तरी पिलीं कैसेनि वांचती । राजा न करी न्यायनीती । तरी पावती प्रजा केविं सुख ॥ १४ ॥

—भक्तविजय.

मातेपुढें नेणतें बाळ । अवाच्य वाणी भलतेंचि वरळे । परी जननी कौतुका मानुनी केवळ । पुरवी लळे तयाचे ॥ १५ ॥ आपली माय दुर्बळ आहे । तरी ते बाळकें त्यागूं नये । दुसरी सुंदर वनिता पाहे । परी पान्हा न ये तिजलागीं ॥ १६ ॥

—संतविजय.

**मोरोपंतः—** **गीति.**

मातृस्तन्यावांचुनि शिशुचा कृश होय वरदुधें काय; ।
बालकपालक जननीस्नेहचि, बोलोनि बहु बुधें काय ? ॥ १७ ॥
स्नेहें शिशुला देइल मातेहुनि अधिक काय सुख दाई ? ।
चंद्रापुढें चकोरा ग्रह होइल कोण अन्य सुखदाई ? ॥ १८ ॥

श्लोक.

पिता जरि विटे, विटो ; न जननी कुपुत्रीं विटे ; ।
दयामृत रसार्द्रधी न कुलकज्जलें त्या किटे; ॥
प्रसादपट झांकिती परि परा गुरूचे थिटे; ।
म्हणून म्हणती भले, 'न ऋण जन्मदेचें फिटे.' ॥ १९ ॥

—स्फुट.

रामदासः—

ओंव्या.

क्षणभरी [ बाळ ] मातेशी न देखे । तरी आक्रंदोनि रुदन करी दुःखें । ते समयीं मातेसारिखें । आणिक कांहींच नाहीं ॥ २० ॥ आस करोनी वास पाहे । मातेविण कदा न राहे । वियोग पळमात्र न साहे । स्मरण झालियानंतर ॥ २१ ॥ जरी ब्रह्मादिक देव आले । अथवा लक्ष्मीनें अवलोकिलें । तरी न वचे बुझाविलें । आपुले मातेवांचोनी ॥ २२ ॥ कुरूप अथवा कुलक्षण । सकळांहून करंटेपण । तरी नाहीं तीसमान । भूमंडळीं कोणीही ॥२३॥ऐसें तें केंविलवाणें । मातेविण दिसे उणें । मागें परतें केलें तिणें । तरि आक्रंदोनी मिठी घाली ॥ २४ ॥ दुःख पावे मातेजवळी । दूरी करतांचि तळमळी । अति प्रीति तये काळीं । मातेवरी लागली ॥ २५ ॥

—दासबोध.

---

# १० देह-दोष.

एकनाथः—

ओंव्या.

देहसंगती अमित दोख । देहसंगती तो श्वान वोक । देह तोचि महानरक परम दुःख देहसंगें ॥ १ ॥ देहाचिये संगतीं । ऐसीं दुःखें नेणों किती । त्या देहसंगा करीन निवृत्ति । कृपें रघुपती आज्ञापी ॥ २ ॥ देहभयें विषयसुख । सर्वथा प्राप्त नव्हे देख । अथवा नव्हे संसारिक । परमार्थ देख तेथ कैंचा ॥३॥ देहभयें साधन । सिद्धि न साधे गा जाण । देहभयें कर्माचरण । वृथा जाण जातसे ॥ ४ ॥ देहभयें न साधे योग । देहभयें न साधे याग । देहभयें

स्वर्गभोग । नव्हे सांग निजप्राप्ति ॥ ५ ॥ देहभयें सकळ दुःख । अणुमात्र नव्हे सुख । आकल्प भोगावे नरक । दुःख अलोलिक देहसंगें ॥ ६ ॥

—भावार्थरामायण.

महीपतिः— ओंवी.

देह सकळ रोगांचें घर । देह कामक्रोधांचें मूळ साचार ।
त्रिगुणांचे विकार । देहापासूनि उठती पैं ॥ ७ ॥

—भक्तविजय.

---

## देह–गुण.

शुभानंदः— ओंव्या.

या नरदेहाची वसती । लक्ष चौऱ्यायशीं जीव कल्पिती । ह्यांताचि साधिजे सत्कीर्ति । साधिजे जीवन्मुक्ति या देहीं ॥ ८ ॥ वित्त गेलेया मिळेल पुढती । राज्य गेलेया मिळेल भूपति । विद्या पुत्र मिळेल युवती । देह पुढती मिळेना ॥ ९ ॥ रणीं वेंचिल्या शरीर । मग कोणाचा संसार । काय कीजे स्त्री सुंदर । नगर घर कोणाचें ॥ १० ॥ कोणाचें द्रव्य कोण माता । कैंचा पुत्र कैंचा पिता । यालागीं यत्नें आपुल्या जीविता । नानापरी रक्षिजे ॥ ११ ॥ आत्मनाशें सर्व शून्य । आत्म्यालागीं त्यागिजे भुवन । करावया प्राणाचें रक्षण । पृथ्वीतळ त्यजावें ॥१२॥

—उद्योगपर्व.

रामदासः— ओंव्या.

धन्य धन्य हा नरदेहो । येथील अपूर्वता पहा हो । जो जो कीजे परमार्थलाहो । तो तो पावे सिद्धीतें ॥ १३ ॥ या नरदेहाचेनि आधारें । नाना साधनांचेनि द्वारें । मुख्य सारासारविचारें । बहुत सुटले ॥१४॥ या नरदेहाचेनि संबंधें । बहुत पावले उत्तम पदें । अहंता सोडोनि स्वानंदें । सुखी झाले ॥१५॥ पशुदेहीं नाहीं गती । ऐसें सर्वत्र बोलती । म्हणोनि नरदेहींच प्राप्ति । परलोकाची ॥ १६ ॥ नरदेह हा स्वाधीन । सहसा नव्हे पराधीन । परंतु परोपकारीं झिजवून । कीर्तिरूपें उरवावा

॥ १७ ॥ देह परमार्थी लाविलें । तरीच याचें सार्थक झालें । नाहीं तरी व्यर्थचि गेलें । नाना आघातें मृत्युपंथें. ॥ १८ ॥

—दासबोध.

## ११ दारिद्य व याचना.

मुक्तेश्वरः— ओंव्या.

मग म्हणे ऐक नागनाथा । गृहस्थां आम्हां कुटुंबवंतां । दारिद्यतुल्य दुसरी व्यथा । यें संसारीं असेना ॥ १ ॥ दारिद्र्यें जीतचि प्रेत जाण । दारिद्र्यें योग्यता तृणासमान । दारिद्र्यें विद्यासमुद्र द्रोण । द्रुपदें छळूनि दवडिला ॥ २ ॥ दारिद्र्यें उदास पुत्रदारा । दारिद्र्यें सुहृद पाठिमोरा । दारिद्र्यें नैषधयुधिष्ठिरां । रानोमाळ भवंडिलें ॥ ३ ॥ दारिद्र्यें श्रेष्ठ कर्मठवेषी । दारिद्र्यें परमार्थ जनाची दासी । दारिद्र्यें गांजिले वनतापसी । धनिकांद्वारीं धांवती ॥ ४ ॥

—आदिपर्व.

दारिद्र्यकाळामाजी देख । नीच श्रेष्ठातें म्हणती मूर्ख ।
उपहासिती सकळ लोक । आप्तवर्ग विशेषें ॥ ५ ॥

—वनपर्व.

शुभानंदः— ओंव्या.

दोषी दरिद्री अधम । दरिद्री तो प्रेतासमान । दरिद्रदोषीं पातक परम । अधर्म असत्य आढळे ॥ ६ ॥ दरिद्रास्तव वनिता कष्टी । आचरती त्या अधम रहाटी । हिंसा तस्कर नरहिंपुटी । नरक कोटी भोगावा ॥ ७ ॥ दरिद्रियासि नाहीं हर्ष । सुहृद असल्या ठेविती दोष । जैसा अपुष्प फळवृक्ष । त्यागी पक्षी सर्वदा ॥ ८ ॥ जैसें शुष्क तडाग थोर । उपेक्षोनि जाति समग्र । तैसा तो पैं दरिद्री नर । परम अपवित्र तिहीं लोकीं ॥ ९ ॥ वर्तत असतां तो शरीरीं । परी प्रेताऐसा तो लोकाचारीं । समयीं भोजना निराहारी । कां परद्वारीं याचक ॥ १० ॥ जीवंत म्हणावा धनाढ्य नर । उभय लोकीं तो पवित्र । तिहीं लोकीं अपवित्र । विज्ञानहीन निर्धन ॥ ११ ॥ जो कां सभाग्य धनाढ्य नर । तोचि सबळ बलाढ्य

थोर । धर्म अर्थ काम स्वर्गपर । धनाढ्य नर भोगिती ॥ १२ ॥ दरिद्रदोषें घातक घडे । वर्णसंकर दोष जोडे । पितरांसहित नरकीं बुडे । तेणें दोषें-करोनि ॥ १३ ॥

—उद्योगपर्व.

महीपतिः— **ओंव्या.**

द्रव्य नसतां आपुले पदरीं । बंधु म्हणती आमुचा वैरी । पिशुन हांसती दुराचारी । ऐसी परी मायेची ॥ १४ ॥ देखोनि निजपुत्र नयनीं । पिता कंटाळे तये क्षणीं । म्हणे आमुचे पोटीं येऊनी । अपकीर्ति तुवां केली ॥ १५ ॥ शेजारी लोक होती कष्टी । म्हणती उगाच पडतो आमचे दृष्टी । कन्या भगिनीच्या जातां भेटी । लज्जित पोटीं त्या होती ॥ १६ ॥ दुर्बळ भ्रतार असतां जाण । कांता नेदीच आलिंगन । पुत्र म्हणती आम्हांसि ऋण । करूनियां ठेविलें ॥१७॥ पुरुष झालिया द्रव्यहीन । त्यासी न पुसती सोयरे पिशुन । जेवीं वृक्षाचीं पत्रें गेलिया झडोन । तेथें विलासीजन न रमती ॥ १८ ॥ कीं रणीं पडतांचि नृपती । देहलोभी रण टाकूनि पळती । तेवीं दरिद्र येतां पुरुषाप्रती । पिशुन करिती अपमान ॥ १९ ॥

—भक्तविजय.

मोरोपंतः— **गीति.**

कर्मरहित मुख तैसें लोकीं श्रीहीन जीवन स्पष्ट, ।
नष्ट स्वकीर्ति सत्कृति, जन पावे ते न नारकीं कष्ट. ॥ २० ॥

—स्फुट.

वामनः— **श्लोक.**

असे जयाला धन तोचि पंडित । कुलीन तो, तोचि गुणी बहुश्रुत, ॥
तो मान्य, तो सुंदर, तो विचक्षण, । धनाश्रयें राहति सर्वही गुण. ॥२१॥

—नीतिशतक.

मुक्तेश्वर— **ओंव्या.**

अयोग्य विपन्नासी तंडे । निशस्त्री शस्त्रधरासी भिडे । दातयासी मागते तोंडें । थोरींव बोले आपुली ॥२२॥ अवलोकितां लोकीं तिहीं । मागण्यापरतें हीनत्व नाहीं ।

तोचि जीवनोपाय पाहीं । रौरवतुल्य याचका ॥ २३॥ चौदा विद्या चौसष्ट कळा । चातुर्यज्ञानें गुणागळा। मागों जातां गोळांगुळा- । प्राय भासे परगृहीं ॥ २४॥ जैशीं आदित्याचीं झाडें । सन्मुख डोलती सूर्याकडे । कीं पत्रें पसरलीं येरंडें । आवर्तनेण सर्वथा ॥ २५ ॥ तैसा दातयासन्मुख । सदा पसारिला हस्तक । नाना अवज्ञेचें दु:ख । तो विभाग तयाचा ॥ २६ ॥

—आदिपर्व.

अवलोकोनि आपणाकडे । शक्तीसारिखें बोलिजे तोंडें ।
याचकें जीविकेच्यिये चाडें । मागों ये तेंचि मागावें ॥ २७ ॥

—सभापर्व.

**एकनाथः—** **ओंवी.**

न मागतां देती आशीर्वचन । करिती नीचाचें सेवन ।
द्याता यावया उपाद्धेपण । द्वारीं संमार्जन यजमानाच्या ॥ २८ ॥

—एकनाथी भागवत.

**महीपतिः —** **ओंवी.**

कृपणासी मागतां निजधन । सुखी नव्हती याचकजन ।
कामिकासी मागतां स्त्रीदान । न पवे सन्मान याचक ॥ २९ ॥

—भक्तविजय.

**मोरोपंतः—** **गीति.**

पसरुनि आनन, मान न धरुनि, वरुनि दासता दरिद्र वदे, ।
अकरुण धनिकजनमनीं लेशहि न प्रार्थना परि द्रव दे. ॥ ३० ॥

**साम्राज्यवामनः—** **श्लोक.**

ऐश्वर्यें भ्रमले जगीं मिरवले; थोडे भले देखिले; ।
नाहीं पारखिले तुवां, वळखिले, गर्वेंचि जे आंखिले; ॥
तारुण्यें पहिले भरें दडपिले, सौख्यें सदा मातले, ।
दुष्पंकीं रुतले, बळेंचि उतले, कामीं सदा रातले. ॥ ३१ ॥

देखतां ऋषि तयासि न पूजी, । वाटतो द्विज तयास रिपू जी ! ॥
भोंवया करुनि वक्र पहातो, । मित्र भिक्षुक अमान्य अहा ! तो. ॥ ३२ ॥
न तो हालवी मस्तकातें कदापी, । दुरूनीच तो शुष्कशब्देंचि दापी ॥
तयीं बोबडी ती चळे भिक्षुकाची, । न ते गोष्टिही गोड बोले फुकाची. ॥ ३३ ॥
अलक्ष्मीस लक्ष्मीस तो वैरभाव । स्त्रियांचाच नैसर्गिकी तो स्वभाव ॥
म्हणूनीच शत्रुत्व या संततीतें, । विचारूनि पाहें [ सती ! ] तूं मतीतें. ॥ ३४ ॥

—सुदामचरित्र.

## १२ श्रोतावक्ता.

श्रीधरः— ओंव्या.

रोहिणीरमणाचें किरण । लागतां चंद्रकांत द्रवे जाण । ना तरी परभृतांचें मौन । वसंतागमनीं फिटतसे ॥ १ ॥ ना तरी दिनमणी देखोन । सूर्यकांतांतून पडे हुताशन । तेवीं श्रोता झालिया सावधान । निरसे जडत्व वक्त्याचें ॥ २ ॥ श्रोता झालिया दुश्चित । व्यग्र होय वक्त्याचें चित्त । निघत असतां कथामृत । कुंठित होतें अवधारा ॥ ३ ॥ गृहा पातलिया ग्राहक । तयाची पाहोनियां भूक । तैसेंचि तया अंशुक । काढोनि दावी व्यवहारी ॥४॥ जरी स्नेहदीप पूर्ण असे । तरी दुरील पदार्थ दिसे । निःस्नेहत्वें मंदत्व दिसे । ही तों प्रचीत सर्वांसी ॥ ५ ॥ ना तरी कंठामाजी निघे उत्थापनी । जितका वायु तितकाच ध्वनि । मंद वायु होतां त्यालागोनी । शब्द सहजचि मंदावला ॥ ६ ॥ मुरली वाजती गोड । परी वाजवितांचि पुरवी कोड । न वाजवितां निश्चल जड । अचेतन काष्ट तें ॥७॥ श्रोतयाचें मन दुश्चित । गोड न लागेचि कथामृत । रोगें व्यापिला जो निश्चित । मिष्टान्नतया नावडे ॥ ८ ॥ चिंतोर्मिरहित जरी श्रोता । आशाराक्षसीवियुक्त वक्ता । तेथींची जी भगवत्कथा । तिचें सुख काय सांगूं ॥ ९ ॥ जरी पुण्य असेल गांठीं । तरी उत्तम श्रोत्याची पडेल गांठी । मग वक्त्याचे ओष्ठपुटीं । शब्दरत्नें विकासती ॥ १० ॥ श्रोता जोडलिया प्रवीण । वाग्देवी उल्हासे पूर्ण । पदोपदीं प्रेमार्थ गहन । प्रसवे जाण अवधाना ॥ ११ ॥ श्रोता मिळतां अधम । वाग्देवी संतापे

परम । होय अर्थाचें पतन । श्रवणरस सर्व आटे ॥ १२ ॥ तान्हयाचें स्तनीं मुख झगटे । तेणें तत्काळ पान्हा फुटे । तें निमालिया तेथेंचि आटे । दुग्ध सर्व ज्यापरी ॥ १३ ॥ त्यापुढें करावें व्याख्यान । तें वक्त्याचें मूढपण । जेवीं माळ-भूमीस कूपखन । दरिद्रसेवन काय व्यर्थ ॥ १४ ॥ कीं अंधासी दिधलें दर्पण । कीं बधिरापुढें केलें गायन । कीं रोगियासि मिष्टान्न । देवोनि काय साफल्य ॥ १५ ॥ कीं सुगंध तैल कुंजरा । अभ्यंग केलें अवधारा । कीं महाफळ समर्पितां वानरा । कीं चंपकमाळा खरासी ॥ १६ ॥ श्रोता मिळतां मतिमंद । वाग्वल्लीचा उपडे कंद । कैंचा तयांसी श्रवणानंद । जरी वक्ता झाला व्यासदेव ॥ १७ ॥ प्रलय-काळीं जलधर । बळें वर्षतसे अपार । परी पालथे घटामाजी नीर । बिंदुमात्र नसेचि ॥ १८ ॥ कोकिळेहूनि मधुर स्वर । ऐसे गाती किन्नर । त्यांसी ऐकणार बधिर । तरी काय सार्थक तयाचें ॥ १९ ॥

—जैमिनिअश्वमेध.

---

## १३ संतांचा उपदेश व पुण्यकथा.

मोरोपंत:— **गीति.**

संतांचे अति हितकर उपदेश तशाचि पुण्यधर्मकथा, ।
यांतें विमुख न हो तूं, वत्सा! सोडूं नकोचि भव्यपथा. ॥ १ ॥
सुखदुःखस्पर्श परा होय अहंकार एक ह्या हेतू ।
सद्बोध हा चतुर्विध भूतभयक्षुब्ध सागरीं सेतू. ॥ २ ॥
श्रमवी, भ्रमवी, मळवी, पळवी सत्कीर्तिला दुराग्रह रे! ।
सेव्य सदुपदेश सुधाग्रह; असदुपदेश हा सुराग्रह रे. ॥ ३ ॥

—स्फुट.

आवड असो कथेची जसि बाळा फाल्गुनांत पुनवेची ।
संतीं वेचावें धन, तापसजन तप जसें तपुन वेची. ॥ ४ ॥
मणिकनकभूषणाहुनि सुबहुमता स्त्रीजना गळसरी ती ; ।
हो तसि सदुक्ति या, हा दावू एकचि, जसा पळस, रीती. ॥ ५ ॥

रंगावें सद्वचनें मतिनें, चूर्णें जसेंच हळदीनें ; ।
भजन न सोडावें म्यां, जेविं कधीं कर्षकें न हळ दीनें. ॥ ६ ॥
चंद्रींच्या अमृतातें सेवायाचें सदार सिकला जो, ।
मज तो चकोर पाहुनि सत्कीर्तिरता सदा रसिक लाजो. ॥ ७ ॥

—सन्मनोरथराजी.

## श्लोक.

हरिपादयुगस्मरणप्रवणें । भगवज्जनदिव्यकथा श्रवणें ॥
चतुरें रसिकें समय क्रमणें, । सुख अन्य नसेचि भवभ्रमणें. ॥ ८ ॥

—प्रल्हादविजय.

कथासुरभि या भल्या स्वजननीहुनी वाटती ; ।
शिशूंस, जरठांसही, निरखितां रसें दाटती ; ॥
दुहोत भलते सदा, तरि न लेशही आटती ; ।
स्ववत्समल भक्षिती, परि न सर्वथा बाटती. ॥ ९ ॥

कथा श्रवणचत्वरीं जरि पुनःपुन्हां ये, रते ।
महारसिक तद्रसीं, विटति ऐकतां येर ते ; ॥
विलोकुनि विलासिनी जन पुनःपुन्हा कामुका ।
करी वश; नव्हे बुळा विवश घेइ ना कां मुका ? ॥ १० ॥

कथा भुवनमोहिनी; अशि न मोहिनी होय, ती; ।
हरो असुरधी, हिनें कितिक मोहिले हो ! यती; ॥
'नव्हे' न म्हणवे, असो, जरि विमोहिला दक्षहा, ।
प्रिया बसविली शिरीं, मुनिपथीं कसा दक्ष हा ? ॥ ११ ॥

सुरासुरनरोरगां भुलवुनी कथा न त्यजी, ।
न भेद करि पंक्तिचा, अमृत पाजिती सत्य जी; ॥
तिणें जरि सुधारस खरतमानसां पाजिला; ।
वधी अमृत घोटितां, द्रव नयेचि बापा ! जिला. ॥ १२ ॥

गीति.

जो प्रेरील प्रेमें गाया श्रीविष्णुच्या चरित्रास, ।
साक्षात् तो श्रीरामचि संसृतिचा वारिता परित्रास. ॥ १३ ॥
सुकविमन न सोडी हरियश, जैसें तोक थान ; यागा या ।
बहुतचि अंतर; विसरे, जो सुरसिक, तो कथा न या गाया. ॥ १४ ॥
हरिचरिताच्या पानें, गानें, भवपाश सुदृढही उकले; ।
मुकले सुखास, ऐसें जे न करिति; पटुहि फार ते चुकले ॥ १५ ॥
भगवान् नारद गातो हरिहरयश, वाजवूनि वीणा रे ! ।
चित्ता ! ज्यातें नमिती सत्कृति रामायणादि वीणारे. ॥ १६ ॥
चित्ता ! जेणें कामप्रमुखाहितसहित कलि वदे ' हा ', तें ।
हरियश चिंती; लटिकें स्पष्ट स्वप्रेम, कळिव देहातें. ॥ १७ ॥

—अवतारमाला.

---

## १४ यश, कीर्ति.

मुक्तेश्वरः —

ओंवी.

पुरुषें तंव जगावें जगीं । जंव अपकीर्ति न शिवे अंगीं ।
अपयशवंत तो कुमार्गी । जिताचि मेल्यासमान ॥ १ ॥

—वनपर्व.

श्रीधरः—

ओंव्या.

जननिंदेचें संभाषण । रायासी हें परम दूषण । सद्यः करी यशहाण । कीर्तिसदन पाहोनी ॥ २ ॥ भगीरथ पुरुरवा ययाती । इक्ष्वाकु हरिश्चंद्र चक्रवर्ती । अद्यापि तयांची कीर्ति । सकळ वर्णिती निजमुखें ॥ ३ ॥ कीर्तिविरहित जन्म । तो परम दुर्मरणासमान । त्यासी न भेटे सर्वोत्तम । व्यर्थ वांचणें तयाचें ॥ ४ ॥ स्त्री पुत्र भ्रातृ प्रिय ज्यास । परी त्यांच्या योगें घडे अपेश । त्यांचा त्याग करावा निःशेष । तरीच सौख्य पावावें ॥ ५ ॥ कीर्तिनिमित्त सोडिती प्राण ।

कीर्तिनिमित्त टाकिती राज्य धन । लोकनिंदातस्कर दारुण । सत्कीर्तिधना चोरिती ॥ ६ ॥

—अश्वमेध.

शुभानंदः— **ओंवी.**

सत्कीर्ति ज्याची जगीं वाढती । त्यातें अक्षय स्वर्गप्राप्ती ।
अकीर्ति लोकीं चालती । अधोगती त्या न चुके ॥ ७ ॥

—उद्योगपर्व.

एकनाथः— **ओंव्या.**

अपकीर्तीचें जें जिणें । लोकांमध्यें लाजिरवाणें । याहीपरीस भलें जीव देणें । परी जिणें न ये कामा ॥ ८ ॥ अपकीर्ति निंदिजे जनीं । कीर्ति वंदिजे वेदीं पुराणीं । कीर्ति आपुली ऐकोनी । सर्वांसि उत्साह होतसे ॥ ९ ॥ कीर्तीकारणें जे जन । करिताति व्रतें तपें दान । कीर्तीकारणें यज्ञआचरण । स्वयें जाण आचरती ॥ १० ॥ कीर्तीकारणें तुळापुरुषदान । कीर्तीकारणें यजनयाजन । कीर्तीकारणें अन्नदान । घरोघरीं जन करिती ॥ ११ ॥ कीर्तीकारणें शास्त्रपठण । कीर्तीकारणें तर्कव्याख्यान । कीर्तीकारणें करिती छळण । वादीं ब्राह्मण एकमेकां ॥ १२ ॥ कीर्तीकारणें विजनीं पाणी । पाजितात पोयी घालोनी । कीर्तीकारणें पंचाग्निसाधनीं । धूम्रपानीं प्रवर्तती ॥ १३ ॥

—भावार्थरामायण.

मोरोपंतः— **गीति.**

यत्नें कीर्तिच जोडीं, बा! होय पदार्थ हाच बहु धन्य; ।
राजे, पंडित, यांचें भूषण नाहींच कीर्तिहुनि अन्य. ॥ १४ ॥
सत्कीर्तिप्रभवा श्री, पुण्यहि सत्कीर्तिचेंचि बा! तोक; ।
ज्योत्स्नेनें चंद्र जसा शोभे, सत्कीर्तिनेंचि हा लोक. ॥ १५ ॥
धन मेळविलें जें, हय, गज, कांचन, रत्नराशि, सत्वर तें ।
त्यां, बा! अकीर्ति होतां, सोडावें तृण तसेंचि सत्वर तें ॥ १६ ॥

—ब्रह्मोत्तरखंड.

## १९ परोपकार.

मुक्तेश्वरः--

### ओंव्या.

म्हणे पवित्र ये संसारीं । धन्य धन्य परोपकारी । सकळ कीर्तिवंत शरीरीं । शिरोमणी तो एक ॥ १ ॥ जिहीं आपल्या सर्व यत्नें । पराचे क्लेश परिहरणें । श्रमोनी पुढिल्या सुख दावणें । तो एक धन्य संसारीं ॥ २ ॥ प्रेरणा न करितां संकटीं । कृपेनें अनाथ घाली पोटीं । केला उपकार न बोले ओठीं । तो एक धन्य पुरुष ॥ ३ ॥ आपुल्यासमान पुढिला पाहे । पराच्या संतोषें संतोष लाहे । अन्यक्लेशें क्लेशत जाये । तो एक धन्य संसारीं ॥ ४ ॥ परोपकारा वरिलें नसतां । विधवासंतति नाशवंता । जैशी नाकाविण वनिता । श्लाघ्य न मानी सौंदर्यें ॥ ५ ॥ परोपकाराविण जो जन । तो जाण हीन पाषाण । तनुधन लोभाविष्ठविण । असे माखून सांडिला ॥ ६ ॥ परोपकाराविण समर्थ नर । तो प्रेताचा देहशृंगार । मांडवावांचोनि वाद्यगजर । नेतां सत्वर दहनार्थ ॥ ७ ॥ जेणें प्रकारें परोपकार । घडे, तोचि गा पवित्राचार । परातें पीडाकारक थोर । तोचि अधर्म जाणिजे ॥ ८ ॥

—आदिपर्व.

श्रीधरः--

### ओंव्या.

खळजनाचा धरणें विश्वास । तेणें होय दुजयाचा नाश । हें तों नावडे सज्जनास । तो परोपकारीच सर्वदा ॥ ९ ॥ पाहतां रोहिणीचा धव । राहुग्रस्त एक पार्श्व । एकाच पार्श्वे जग सर्व । पीयूषेंकरूनि निववीत ॥ १० ॥ तावितां दिव्य होय सुवर्ण । घासितां सुगंध चंदन । गाळितां सुरस इक्षु पूर्ण । तेवीं सज्जन परोपकारी ॥ ११ ॥ जोंवरी आहे संपत्तिभार । तोंवरीच साधावा परोपकार । दधीचि मुनीनें आपुलें शरीर । देवकार्या लाविलें ॥ १२ ॥ ना तरी अमावास्येचे चंद्रें । शीतळ होती काय शरीरें । उष्णकाळींचे जलधरें । काय वृष्टि करिजेल? ॥ १३ ॥

—अश्वमेध.

आपणासमान विश्व पाहत । पराच्या मोदें अति संतोषत । परक्लेशें व्याकुळ चित्त । परोपकारी पुरुष तो ॥ १४ ॥ संकटीं पडतां प्राणी । पाठीस घाली कृपा करूनी । केलें सुकृत न वदे वदनीं । परोपकारी पुरुष तो ॥ १५ ॥ धिक् संपदा धिक् ज्ञान । धिक् विद्या धिक् अभिमान । परोपकार केलियाविण । संपत्ति विधवा निंद्य ती ॥ १६ ॥

—पांडवप्रताप.

शुभानंदः— **ओंव्या.**

तोय मधुर आणि गोड । परी पाषाण फोडी प्रचंड । पुरवी तसें जगाचें कोड । परोपकारी सर्वदा ॥१७॥ धेनु भक्षोनियां तृण । दुजेया करवी पयःप्राशन । पर्णभक्षक रामभजन । करोनि धन्य ते झाले ॥१८॥ चंदन झिजोनि आपण । निववी दुजया देहींचें उष्ण । सुगंधें उपचारी संपूर्ण । परोपकारालागोनी॥१९॥कर्पूर विरोनि सुगंध करवी । आगरू जळोनि परिमळ दावी । परोपकारी सत्कीर्ति बरवी । घेती देहलोभ सांडोनी ॥ २० ॥ परोपकारीं व्रावरे पवन । परोपकारी दाहकयज्ञ । परोपकारीं वर्षे जीवन । हें तूं सज्ञान जाणसी ॥२१॥ परोपकारी हे मेदिनी । खननहननमळमूत्रविसर्जनीं । भूतत्रास न घेतां मनीं । परोपकारी सर्वदा ॥२२॥ पिकवी अठरा परींचीं धान्यें । पशुपक्षियां फळतृणें । करोनि भूतांचें रक्षण । पृथ्वी वाहे संतोषें ॥ २३ ॥ शेष फणाग्रीं मेदिनी । धरोनि परोपकारालागोनी । सर्वदा वसे पाताळभुवनीं । हें त्वां कानीं परिशिलें ॥ २४ ॥ परोपकारालागीं हरी । वराह होऊनी भूमि दाढे धरी । कांसवरूपें पृष्ठीवरी । हे वसुमती आवरिली ॥२५॥

—उद्योगपर्व.

वामनः— **श्लोक.**

श्रुतेंचि कीं श्रोत्र न कुंडलानें, दानेंचि कीं पाणि न कंकणानें. ॥
साजे तसा देहहि हा न आनें, परोपकारेंचि, न चंदनानें. ॥ २६ ॥

नीतिशतक.

मोरोपंतः-- गीति.

श्लाघ्य उदारपणचि बहु धनवंतासचि न, अल्प धनिकांहीं; ।
तैसेंचि सहिष्णुत्वहि उचित समर्थां तसें न जनिं कांहीं. ॥ २७ ॥
प्रियभाषणसह दान, ज्ञानहि गतगर्व, वित्त सत्याग, ।
शौर्य क्षमासहित; या पावे चहुं मंगलां महाभाग ॥ २८ ॥
दुःखित जनीं कृपेचा प्रभुस न येईल कां वरा उत ? ।
चोरत्र ता सोडुनि न भला राहेल लांब राऊत ॥ २९ ॥
येतील समर्थांच्या कार्यास समर्थ; काय तें चित्र ? ।
तो धन्य, स्तवनोचित, जो दीनजळासि दुग्ध सन्मित्र. ॥ ३० ॥
जरि सिंधु जीवनाचीं क्षणहि नदे, करुनियां दया, दानें; ।
तरि वांचावे कैसें ? रक्षावें वा स्वयाद यादानें ? ॥ ३१ ॥
दवडाया दीनांचीं दुःखें सर्वस्व वेंचिती संत, ।
संतप्ता निववी घन, वन शृंगारी ' व 'कारवान् संत. ॥ ३२ ॥
पंकांत दैवयोगें जी पावाया श्रमा रुते गाय, ।
तीचा उद्धर्ता जो, त्यासि सकल लोक [ मारुते ! ] गाय. ॥ ३३ ॥
करिती सकुटुंब महा दुष्काळीं दीन जन उपासा जे, ।
तैशांवरि सत्पांहीं जी केली, तीच बहु कृपा साजे. ॥ ३४ ॥
चुकल्या जनास कोणी सांगुनि निजहितपथास जो लावी, ।
धनदेंही उपकृतिशीं त्याच्या निजसंपदा न तोलावी. ॥ ३५ ॥
जरि याचितार्थ न पवे, सुखरोमांचाढ्य आंतवरि काय ।
तत्काळ याचकाचा जें न करी दान, तेंहि तरि काय ? ॥ ३६ ॥
युद्धीं देहत्यजिते अनिवर्ती पुरुष जे, सुलभ अजि ते ; ।
अतिदुर्लभ सत्पात्रीं श्रद्धेनें सर्वही धन त्यजिते. ॥ ३७ ॥
दुर्गति जशांतशांचे सर्वस्वें काम पुरवितां आली, ।
कल्याणसंपदा ती साक्षात् श्रीची खरीखुरी आली. ॥ ३८ ॥

श्लोक.

जैसें असाधूस अकार्य नाहीं, ।
किंवा तितिक्षूंस असह्य कांहीं, ॥
न अन्य त्या, ज्या समदृष्टि मान्या, ।
अदेय तैसेंच नसे वदान्या. ॥ ३९ ॥

—कृष्णविजय.

वामनः— ओंव्या.

जे अत्यंत उदार । चित्त त्यांचें म्हणावें थोर । स्पृहा नसणें हा प्रकार । उदारत्वाचा ४० ॥ स्पृहा धरोनि लाभाची । व्यवहारें उदंड धन वेंची । तेही काय तयाची । उदारता म्हणावी ? ॥ ४१ ॥

—यथार्थदीपिका.

---

## १६ पंडित.

मुक्तेश्वरः— ओंव्या.

शोकभयाचे आघात । क्षणक्षणां होती प्राप्त । मूर्ख होती व्याकुळचित्त । ज्ञानें पंडित भ्रमेना ॥ १ ॥ आपत्काळ देखोनि पुढें । ज्ञानियां आंगीं वीरश्री चढे । कोटी दुःखाचे दळवाडे । विवेकलता विभांडी ॥ २ ॥

—वनपर्व.

एकनाथः— ओंवी.

ज्यासी शांति आणि समाधान । साचार बंधमोक्षाचें ज्ञान ।
तो महापंडित जाण । ऐसें श्रीकृष्ण बोलिला ॥ ३ ॥

—भागवत.

शुभानंदः— ओंव्या.

विदुर म्हणे लोकविरुद्ध । कर्म नाचरती प्रबुद्ध । अधर्म असत्य निषिद्ध । नाचरे तोचि पंडित ॥ ४ ॥ नित्यनैमित्तिक फळाशा न धरी । क्रोध हर्ष दर्प नातळे तिळभरी । सुखदुःख पातले तिळभरी । तोचि पंडित जाणिजे ॥ ५ ॥ ऐश्वर्य-

काळीं न फुगे मनीं । दुःख आलेया नाफळी मूर्धी । शीत उष्ण मानापमानीं । तोचि पंडित जाणिजे ॥ ६ ॥ वर्णाश्रमकर्मआचरण । धर्मार्थ अर्थपरिग्रहण । कामना सांडोनि करी दान । तोचि पंडित जाणिजे ॥ ७ ॥ स्वशक्ति ऐशी अद्वैत-भक्ति । आगळा सोस न मनीं चित्तीं । परानुदुःख न मानिती । तोचि पंडित जाणिजे ॥ ८ ॥ परपैशुन्य नायके कानीं । परिसुनी न बोले वदनीं । स्नेह वाढवी सज्जनीं । तोचि पंडित जाणिजे ॥ ९ ॥ अप्राप्य त्याची इच्छा न करी । गेलेयाचा शोक मनीं न धरी । आपत्काळीं धैर्य धरी । तोचि पंडित जाणिजे ॥ १० ॥ विभागासी आली पाळी । वर्ते संतसज्जनमेळीं । ज्ञानदृष्टीं आत्मा निहाळी । तोचि पंडित जाणिजे ॥ ११ ॥ अनायासी हो सायासी । अर्थ आलेया हातासी । द्वैतभक्तीं तोषवी जनासी । तोचि पंडित जाणिजे ॥ १२ ॥ नित्या-नित्यविवेक । मनीं सांडिला संकल्प । सर्वदा आत्मा उपासक । तोचि पंडित जाणिजे ॥ १३ ॥ अंतरीं बोधिला ब्रह्मबोधें । बाहेरी चाले जनाचे छंदें । मुख न विटाळे नीच शब्दें । तोचि पंडित जाणिजे ॥ १४ ॥ ऐश्वर्य आलेया संपूर्ण । निरभिमानें आत्मा सज्जन । भजोनि पावे समाधान । तोचि पंडित जाणावा ॥ १५ ॥ आश्रय झालेया समर्थाचा । परोपकारीं वर्ते वाचा । चाळा लावी हरि-भजनाचा । तोचि पंडित जाणावा ॥ १६ ॥ आपणासमान सर्वांतरीं । सुख-दुःख मानी संसारीं । भूतकृपाळ सदाचारी । तोचि पंडित म्हणावा ॥ १७ ॥ सर्वदा हरिहरनामजप । निववी दुर्जयाचा संताप । परातें नेदी पश्चात्ताप । तोचि पंडित जाणिजे ॥ १८ ॥ या नश्वर संसारीं । न तोडी धर्मगळसरी । केल्या कर्मीं कामना न धरी । तोचि पंडित जाणिजे ॥ १९ ॥ नित्य नैमित्तिक कर्मादिक । यथाशक्ति करी साधक । तें ब्रह्मार्पण करी सकळिक । तोचि पंडित जाणिजे ॥ २० ॥ जो कां कल्पी फळकामना । ते व्यभिचारभक्ति माना । जैशी जारकुळांगना । धर्ममार्गी अपवित्र ॥ २१ ॥ ते भ्रतारसेवा बरवी करी । परी भ्रतार दुखवे अंतरीं । तैशी भक्ति व्यभिचारी । भोक्ता श्रीहरी तिचा नोहे ॥ २२ ॥ काया वाचा मनेंकरून । भावें करितां समर्पण । दंभ-फळाशा त्यजून । श्रीनारायण तिचा भोक्ता ॥ २३ ॥ तेव्हां भोक्ता जनार्दन ।

तो उचित करी समर्पण । तो पद पावे ब्रह्मनिर्वाण । तोचि पंडित जाणिजे ॥ २४ ॥ कर्मे सुखदुःख या जगतीं । योनी चौऱ्यायशीं भोगिजती । निष्कर्मे पावे सायुज्यमुक्ति । तोचि पंडित जाणिजे ॥ २५ ॥ ब्रह्म जाणोनि अंतरीं । पाहुणेयापरी संसारीं । परद्रव्य परस्त्रीपासूनि दुरी । तोचि पंडित म्हणावा ॥ २६ ॥ पक्षी आला आंगणा । पथिक आला पट्टणा । कमळपत्रींच्या जळकणा । संसारीं शहाणा त्यापरी ॥ २७ ॥ मनीं जाणोनि आपलें हित । सदा संसारीं अलिप्त । कल्पना मारिली समस्त । तोचि पंडित म्हणावा ॥ २८ ॥ गेलेयाचें दुःख न करी । केलें न बोले बाहेरी । परनिंदा जिव्हा स्पर्श न करी । तोचि पंडित जाणावा ॥ २९ ॥ सर्वांभूतीं दयापर । बोलणें तें मधुरोत्तर । शब्दें न फोडी परजिव्हार । तोचि पंडित जाणिजे ॥ ३० ॥ जैसें तोय मधुर शीतळ । परी पाषाण भेदुनि निघे झुळझुळ । आर्जवें साधी कार्य सकळ । तोचि पंडित म्हणावा ॥ ३१ ॥ भावें करी हरिहरभक्ति । श्रवण कीर्तन सत्संगती । नुलंघी धर्मशास्त्रवित्पत्ती । तोचि पंडित जाणिजे ॥ ३२ ॥ चंदन अगर धूप कर्पूर । हे श्रमविती स्वकीय शरीर । स्वयें जोडोनि परोपकार । वंद्य झाले हरिहरां ॥ ३३ ॥ तैसा पुण्यात्मा पावन । सत्य न सोडी गेलेया प्राण । अनुद्वेगें भूतकृपाळ पूर्ण । तोचि ज्ञानी पंडित ॥ ३४ ॥ सुखदुःखीं नव्हे निमग्न । पराचे दुःखें दुखवे मन । आत्मवत्सर्वभूतीं मानी जन । तोचि पंडित म्हणावा ॥ ३५ ॥ जैसी गंगा का धरणी । परी अनुपकार नाणी मनीं । त्यापरी क्षमाशीळ जनीं । तोचि पंडित म्हणावा ॥ ३६ ॥ नाठवी आपण उचित केलें । न स्मरे दुर्जयानें दुःख दिधलें । ईश्वरसूत्रातें ओळखिलें । तोचि पंडित म्हणावा ॥ ३७ ॥ शास्त्रमर्यादा सदा पाळी । पुराणश्रवणीं प्रीति आगळी । परातें तोषवी सर्वकाळीं । तोचि पंडित जाणिजे ॥ ३८ ॥ सन्मानिलेया हर्ष नोहे । अपमान केलेया क्रोध नोहे । गंगाऱ्हदसम स्वस्थ आहे । तोचि पंडित जाणिजे ॥ ३९ ॥ सर्वांतरीं वासुदेवो । उद्भवस्थितिनाश न भावो । जाणे ज्ञानियांचा रावो । तोचि पंडित जाणिजे ॥ ४० ॥

—उद्योगपर्व.

मोरोपंतः— गीति.

विदुर म्हणे, जो आस्तिक, गुरुवेदोक्तीं जयास विश्वास, ।
मीपण ज्यास न शिवलें, तो पंडित मान्य होय विश्वास. ॥ ४१ ॥
दुर्लभ वस्तु न वांच्छी, न करी जो नष्ट वस्तुचा शोक, ।
आपत्तींत न मोहे, त्या पंडित म्हणति जाणते लोक ॥ ४२ ॥
बहु कर्म करी पंडित, कथनावसरींहि थोडकेंच वदे ।
शाकांत प्रवर जसें, पथ्यहि तसेंच, दोडकें चव दे. ॥ ४३ ॥
चुकवी कुगति, यशें उत्सुकवी सन्मन, असन्मनें सुकवी, ।
सुखवी मातेला निजमुखवीक्षामृतरसेंचि तो सुकवी. ॥ ४४ ॥
देहादि द्वैत मृषा जाणोनि परस्वभावकर्मातें ।
जो न स्तवी, न निंदी पावतसे तोचि सुज्ञ शर्मातें. ॥ ४५ ॥

—स्फुट.

वामनः— श्लोक.

जें का ज्ञानें लाधलें सद्विचारा, । संपत्तीचा त्यांपुढें काय तोरा? ॥
पद्माचा जो तंतु तो वारणाला । वारायाला पैं म्हणे सिद्ध झाला. ॥ ४६ ॥

—नीतिशतक.

---

## १७ देवतुल्य सत्पुरुष.

मुक्तेश्वरः— ओंव्या.

जो ऐश्वर्यें न चढे मदा । दरिद्रत्वें दीनत्व न शिवे कदा । निंदी त्याची न करी निंदा । तो नारायण नररूपें ॥ १ ॥ कामक्रोधभूतसंचारीं । न चळे सुविचार-पंचाक्षरी । परधनपरस्त्रीपासोनि दुरी । तो नारायण नररूपें ॥ २ ॥ परोत्कर्षे निर्वैर मनीं । समानबुद्धि मानापमानीं । दंभाचार सांडिला मनीं । तो नारायण नररूपें ॥ ३ ॥ स्वधर्मकर्पूरगृहाआतौती । जिव्हालिंगप्रदीपत्वाती । रक्षुनी रहाटे सावधमाति । तो नारायण नररूपें ॥ ४ ॥ सज्जनश्रोत्रियां देखोनि नेत्रीं ।

जो गर्व स्वयेंचि दवडी दुरी । शीर्षे वाट झाडी पुढारी । तो नारायण नररूपें ॥५॥ हरिहरनामाचे जीवनीं । जिव्हा तळपे होवोनि मीनी । कुतर्क शिमग्यासमान मानी । तो नारायण नररूपें ॥ ६ ॥ सत्य आणि सहनशील । तेणें जिंकिलें विश्व सकळ । ऐशिया गुणीं सर्वकुशळ । म्हणोनि वंद्य विश्वातें ॥ ७ ॥ सर्वांभूतीं समान दया । निर्जर नमस्कारती तया । ऐशिया गुणीं भूषित काया । म्हणोनि प्रिय देवातें ॥ ८ ॥ वनिता मनोरम एकांतीं । आपण होउनि पुरुषा प्रार्थी । तेथें जो निर्विकल्प चित्तीं । तोचि शंकर म्हणों ये ॥ ९ ॥ विजनीं भरलीं कनकें पाहे । देखिल्यावरी लोटी वायें । ऐशी निर्लोभता लाहे । तोचि शंकर म्हणों ये ॥ १० ॥ जया अधीन मन इंद्रियें । न मनी सुखदुःखाचे घाये । छळितांही परक्रोधा न ये । तोचि शंकर म्हणों ये ॥११॥ विश्व हें अवयव आपुले । यांहीं केल्या आपण केलें । ऐसें साचार जया कळलें । तोचि निश्चयें जगदात्मा ॥ १२ ॥

—आदिपर्व.

दोषियाचे दोष अनेक । बोलणें तो अविवेक ।
न बोले नाठवी तो देख । मूर्तिमंत ईश्वर ॥ १३ ॥

—वनपर्व.

---

## १८ संतमहिमा.

श्रीधरः—

### ओंव्या.

आतां वंदूं संत सज्जन । जे वैराग्यवनींचे पंचानन । कीं ज्ञानांबरींचे चंडकिरण । उदय अस्त नसे जयां ॥ १ ॥ जे भक्तसरोवरींचे राजहंस । जे का अविद्यारण्य-हुताश । कीं ते पद्महस्ती विशेष । भवरोगवैद्य होती ॥ २ ॥ कीं जीव पावे आपुले पदासी । ऐसा मुहूर्त देणार ज्योतिषी । कीं ते पंचाक्षरी स्वप्रतापेंसी । पंचभूतांसी पळवीत जे ॥ ३ ॥ कीं दैवी संपत्तीचे भाग्यवंत । मुमुक्षा करिता दरिद्ररहित । कीं ते दयेचीं अद्भुत । गोपुरें काय उंचावलीं ॥ ४ ॥ संत आणि इतर जन । दिसती जैसे समसमान । परी संत सदा आनंदघन । ब्रह्मानंदें

डोलती ॥ ५ ॥ बकासंगें असतो मराळ । दिसती सारखे शुद्ध धवळ । परी क्षीर आणि जळ । करिती वेगळें हंसचि ॥ ६ ॥ वायसांत वसे कोकिळ । त्यांच-सारिखा दिसे केवळ । परी येतां वसंतकाळ । पंचमस्वर आळवी ॥ ७ ॥ जंबुकवनांत वाढला केसरी । परी काय तया जंबुकसरी । क्षणमात्रें गज विदारी । ह्मकें भरी निराळ ॥ ८ ॥ स्फटिकांत मुक्ताफळ जाण । दिसे सारिखें समसमान । मुक्त जोहरी काढी निवडून । करिती जतन जीवेंसी ॥ ९ ॥ पाषाणांत परीस पूर्ण । दिसे तैसाचि जड कठीण । परी तो करी लोहाचें सुवर्ण । कृष्णवर्णातें लपवी ॥ १० ॥ कस्तुरी आणि मृत्तिका । दिसे रंग एकसारिखा । परी मृगमद-सुवासें सकळिकां । श्रीमंतांसी निववीतसे ॥ ११ ॥ तक्र दुग्ध एकवर्ण । परी दुग्ध गोड सकळांसी मान्य । तैसें संतांचें रूप जाण । इतरांसमान न गणावें ॥ १२ ॥

--रामविजय.

जे चातुर्यार्णवींचीं रत्नें । कीं शांतिभूमीचीं निधानें । कीं भक्तिवनींचीं सुमनें । विकाशिलीं साजिरीं ॥१३॥ कीं ते वैराग्यअंबरींचे दिनकर । कीं अक्षय्य विज्ञाना-नंदचंद्र । कीं अपरोक्ष ज्ञानसमुद्र । नलगे अंत कोणातें ॥ १४ ॥ कीं ते प्रेमगंगेचे ओघ । कीं ते स्वानंदसुखाचे मेघ । अखंड धारा अमोघ । वर्षती मुमुक्षुचातका ॥१५॥ कीं ते श्रवणामृताचे कुंभ । कीं ते कीर्तनाचे अचळ स्वयंभ । कीं ते स्मरणाचे सुप्रभ । ध्वजचि पूर्ण उभारिले ॥ १६ ॥ कीं ते हरिपद्मींचे भ्रमर । कीं विवेक-मेरूचीं शृंगें सुंदर । कीं ते क्षमेचे तरुवर । चिदाकाशीं उंचावले ॥ १७ ॥ कीं ते मननजळींचे मीन । कीं तें भवगजारिपंचानन । कीं परमार्थाचीं सदनें पूर्ण । निर्मळ शीतळ सर्वदां ॥ १८ ॥ कीं ते दयेचें भांडार । कीं उपरतीचें माहेर । कीं कीर्ति-जहाजें थोर । भक्तिशीड फडके वरी ॥ १९ ॥ कीं ते परलोकींचे सखे । कीं ते अंतकाळींचे पाठिराखे । वैकुंठनाथ ज्यांचे भाके । गुंतोनि तिष्ठे त्यांपाशीं ॥ २० ॥

--हरिविजय.

शुभानंदः—

## ओंव्या.

ब्रह्मसाधनाचा श्रेष्ठोपाय । निगर्वे धरावे संतपाय । त्याविना करितां बहु उपाय । एकही नये उपेगा ॥२१॥ शरण अनन्य होतां संतां । संत ते अनन्य शरणागता । कृपा उपजे ज्यांचे चित्ता । उद्धरती पैं क्षणैकें ॥२२॥ संत ते साकार अनंतरूप । संत ते पूर्ण परब्रह्मस्वरूप । संत ते केवळ ज्ञानदीप । दवडिती पापतम प्रकटोनी ॥ २३ ॥ संत तोचि अनंत जाण । संतपूजेनें संतोषे भगवान । फळ बाळका अर्पण । केल्या वडील ज्यापरी ॥ २४ ॥ लालवितां अर्भकातें । स्नेह उपजे पैं जननीतें । भक्त पाववितां सुखातें । ईश्वरातें सुख त्यापरी ॥ २५ ॥

—उद्योगपर्व.

मोरोपंतः—

## अभंग.

सर्वत्र अद्रोह, अनुग्रह, दान, । हें त्रय, निधान कल्याणाचें ॥ २६ ॥
संतांच्या ठायीं हें धर्मत्रय वसे, । इतरत्र नसे क्षणमात्र ॥ २७ ॥
संतांसी जो आला शत्रुही शरण । तयासी मरण न ते देती ॥ २८ ॥
फळतो दगड धरितां विश्वास । हें आहे विश्वास अवगत ॥ २९ ॥
मग संतीं दृढ ठेवूनी विश्वास । सोडिला निश्वास उष्ण कोणीं ॥ ३० ॥
संतांची शाश्वत धर्मी चित्तवृत्ती । अधर्मी प्रवृत्ती स्वप्नीं नसे ॥ ३१ ॥
संतांची संसारनदीनौका कथा । त्या संतांसी व्यथा कासयाची ॥ ३२ ॥
साधुसंत गंगायमुनांचे ओघ । हा संगम मोघ कधीं नाहीं ॥ ३३ ॥
संतांपासुनियां संतां भय झालें । असें काना आलें नाहीं कधीं ॥ ३४ ॥
संत चालवीती सत्यें तरणीतें । तपें धरणीतें धरिताती ॥ ३५ ॥
किंबहुना संत सर्वांचीही गती । संत मुक्तिपती संत ज्ञान ॥ ३६ ॥
व्रत चालवी तें एक संतराय । नामें अंतराय जाती दूर ॥ ३७ ॥
प्रसाद शाश्वत, अर्थ, बहुमान, । यांचें मूलस्थान संत तुम्ही ॥ ३८ ॥

—सावित्रीगीत.

वामनः—

## सवाई.

नम्रपणेंचि महोन्नत, जे गुण वर्णुनियां परकीय जनांचे ।
सांगितल्याविण दाविति कौशल सर्वजनांप्रति जे स्वगुणांचें; ॥
स्वार्थ, परार्थहि, साधिति; जिंकिति शांतिबळें मुखरत्व खळाचें; ।
संत महाद्भुत भाजन यापरि सेवन कोण करी न तयांचें? ॥ ३९ ॥

—नीतिशतक.

मोरोपंतः—

## श्लोक.

वरि दिसे मृदु मौक्तिक पोंवळें, । परि न लेश तदंतर कोंवळें; ॥
न तुळवे विधु, अंकित जो मळें, । सरस साधुमनें शुचि, कोमळें ॥ ४० ॥

मित्राप्तां म्लानि देतो, जरि अमृतरसालागिं हा चांद वीतो; ।
साधू तैसा कसा? जो सुखवुनि सकळ प्राणियां नांदवीतो; ॥
साधूच्या दर्शनानें अशिव तिथि अशी सर्वथा आढळे ना; ।
साधूचें तेज रात्रंदिवस समचि तें सोडुनी त्या ढळेना; ॥ ४१ ॥

—भक्तभूषण.

## गीति.

करुणेचें वतन तुम्ही, शांतीचें भाग्यवंत माहेर, ।
सुघन ज्ञानरसाचे संत रवे मधुर आंत बाहेर. ॥ ४२ ॥
स्मरभूतभूतवैद्य, स्पर्शमणी सर्व पापिलोहाचे, ।
ब्रह्मग्रह संत तुम्ही प्रणतजनाच्या अनादिमोहाचे ॥ ४३ ॥
सुरभिस्वर्द्रुमचिंतामणि शिष्याचे दयानिधी पंत; ।
निजबिंब प्रतिबिंबा अमृतकराचे खरे तुम्ही संत. ॥ ४४ ॥
साधुगुणग्राहकता, भूतीं सर्वत्र सर्वदा समता, ।
गुरुरीति वसे संतापाशीं हे उक्ति सर्व दासमता. ॥ ४५ ॥
विमल सकल गुण तुमचे कां न सुधाधिक म्हणों? निवे दास ।
ज्यांच्या श्रवणेंचि; असे अद्भुत, रुचले म्हणोनि वेदास ॥ ४६ ॥

—दत्तदयोदय.

महिपती:— ओंव्या.

शत्रु भासती मित्रासमान । पराचे नेणे दोषगुण । ब्रह्मरूप भासे जन । हेंचि लक्षण संतांचें ॥ ४७ ॥ आपली संपदा आणि धन। तस्करीं नेलें ऐकोन । चित्तीं वाटे समाधान । हेंचि लक्षण संतांचें ॥ ४८ ॥ आपलें आणि पराचें बाळ । रडतां देखूनि तत्काळ । दोहींची सारखी तळमळ । हेंचि लक्षण संतांचें ॥ ४९ ॥ रायें दिधलें वस्त्रभूषण । कीं रंकें आणिलें भाजीपान । दोहींचा संतोष समान। हेंचि लक्षण संतांचें ॥ ५० ॥

—भक्तविजय.

अपमानीतां न मानी शीण । निखंदितां न क्षोभे मन । धिक्कारितां न रुसणें । भगवज्जन तोचि कीं ॥ ५१ ॥ उणेपणें लोक लाजविती । तरी खेद न मानी चित्तीं । तोंडावरी मारितां नाहीं खंती । संत त्याप्राति म्हणावें ॥ ५२ ॥ तस्करीं हिरोनि नेली संपत्ति । प्रयत्न न करी पिशुन हासती । श्रीरामभजनीं अधिकोत्तर प्रीती । संत त्याप्रती म्हणावें ॥ ५३ ॥

—संतविजय.

---

## १९ साधुच्छळाचें फळ.

एकनाथ:— ओंवी.

साकरेचें वृंदावनफळ केलें । कडू म्हणतां ते स्वयें मुकले ।
तेवीं साधूचें कर्म निंदोनि बोले । ते ते गेले अधःपाता ॥ १ ॥

—भावार्थरामायण.

शुभानंद:— ओंव्या.

संतांसी देतां संतोष । त्यावरी संतोषे जगदीश । संतांतें पावलिया क्लेश । नाशी जगदीश त्या समूळीं. ॥२॥ घेतां संतांचें प्रसन्नवचन । मनोभीष्ट दे त्या जनार्दन । भक्तद्वेषियाचें हनन । श्रीनारायण पैं करी. ॥ ३ ॥

—उद्योगपर्व.

मोरोपंतः—

## गीति.

जें साधूस दिलें तें आपण भोगील दुःख आमरण ।
उदकीं पक्व घटासीं सुघटितहि करील काय आम रण ? ॥ ४ ॥
करितां साधूच्छेद स्वोच्छेदचि होय हो ! यश न राहे, ।
खळ कामकोपलोभ च्छळिति बळें करुनियां वश नरा हे. ॥ ५ ॥
व्यसनीं न पडेल कसा व्याघ्रपिलीं जो मदांध ओतु निघे ? ।
कीं पद्मराग मानुनि जो पदरीं विंगळाशि ओतुनि घे ? ॥ ६ ॥

—स्फुट.

## श्लोक.

साधूंच्या लंघनीं होतो नीचाचा घात रोकडा ।
बोकडा मारक नव्हे मेरुचा काय हो ! कडा ? ॥ ७ ॥
होतोचि प्राप्त मृत्यु स्वभुजबळमदें लंघितां अर्णवातें; ।
पावे, गर्वें उडे, तो पतन, उडविलें ज्यापरी पर्ण वातें; ॥
ज्या दुष्टें सज्जनांचा अकरुणहृदयें चिंतिला घात, ‘ लागा ।
पाठीं, त्या खा ;’ न साधू म्हणति, परि अघीं तो मुखीं घातला गा !॥८॥
अत्युग्र ब्रह्मशापादिकहि हरिजनां शाप नेदीच कांहीं, ।
जो कोणी देवदासच्छळक खळ, तया रक्षिता अन्य नाहीं ;
रक्षी साधूचि येतां शरण निपटुनी त्यागिता उद्धतत्त्व ।
ज्ञाते हें अंबरीषक्षितिपतिचरितीं पाहती शुद्ध तत्त्व. ॥ ९ ॥

—भक्तभूषण.

## गीति.

जरि कोंडिला तरि हिरा, स्तविलाचि शिरीं चढे न शिरगोळा ।
तो हारवील निजशिर, जो खळ करणार साधुशिर गोळा. ॥ १० ॥

—स्फुट.

## २०. साधुरीति.

मुक्तेश्वरः— ओंव्या.

कुंजरदशन वाढतां पुढें । ते लोटितां नव्हती मागिलीकडे । सज्जनवचन तेणें पाडें । पालटों नेणे कल्पांतीं ॥ १ ॥ जो सन्मानें न पावे हर्षा । अवमानें नये संतापरोषा । त्या देवलोकीं पवित्र पुरुषा । पूजा पावे विशेष ॥ २ ॥

—आदिपर्व.

गेलें हृदयीं नाठवावें । केलें मुखीं न बोलावें ।
सत्य सर्वथा न सांडावें । साधुवर्तन या नांवें ॥ ३ ॥

—सभापर्व.

एकनाथ :— ओंव्या.

सज्जनाचा स्वभाव पूर्ण । दीनदयाळ चातकघन । अनाथासी देखतां जाण । घेती धांवोनि उचलोनि ॥ ४ ॥ गोड लागे निज मानसीं । तें वंचोनि स्वगोत्रासी । नेदोनि स्त्रीपुत्रासी । अनाथासि अर्पित ॥ ५ ॥ सज्जनाचें मुख्य लक्षण । ब्रह्मस्वरूप स्वयें आपण । जग देखणें ब्रह्मपूर्ण । कपटचिन्ह तो नेणे ॥ ६ ॥ बाळकाची अति प्रीति । माउली शौचाशौच न विचारिती । प्रेमें उचलोनि खांदीं घेती । मळ क्षाळिती निजकरीं ॥ ७ ॥ परी तेथेंही एक नवल । जननीजनकें धुतले मळ । ते पुनरपि होय कश्मल । सज्जनाचे करकमळ ते सबाह्य मळ क्षाळिती ॥८॥ सज्जनाचा हात माथां । पडतां जाली पतिव्रता । ब्रम्हादिक निजमाथां । वंदी तत्वतां पूज्यत्वें ॥ ९ ॥ परीस फोडावया जाण । सबळ बळें हाणिती घण । त्यासी करितां सुवर्ण । नलगे क्षण तत्वतां ॥ १० ॥ तरी परीस बापुडें तें किती । लोहाचे ठायीं सुवर्णस्फूर्ती । परीस न करीच निश्चिती । निजस्थिति वंचिली ॥ ११ ॥ तैसा नव्हेचि चंदन । अंगवात झगटतांची पूर्ण । उद्यान केलें आपणासमान । न्यूनपूर्ण असेना ॥ १२ ॥ खैर धामोडे समग्र । वेहळकटी टाकिली अत्युग्र । आदिकरोनि पांगार । जाले समग्र चंदन ॥ १३ ॥ आणिक गुण अलोकिक । जो छेदावया आला देख । त्यासी परिमळ अधिक । जाळित्या देख तयाहोनि ॥ १४ ॥ तेवीं सज्जनाचें लक्षण । छळे द्वेष-

भावें पूर्ण । जो आला तयापासी जाण । त्यासी समाधान सारिखंचि ॥ १५ ॥ सूर्याचें सामर्थ्य गगनीं । स्वयें नेणे दिनमणी । तें जाणतसे कमळिणी । सुखविकासिनी पैं झाली ॥ १६ ॥ चुंबकाची चाळकशक्ति । स्वतां नेणे निजस्थिति । जडें लोहें सुखेंचि जाणती । ते चळण पावती दर्शनें ॥ १७ ॥ चंद्रकिरणींची अमृतधार । स्वतां नेणे हिमकर । सेवूनि जाणती चकोर । दर्शनें अपार आनंद ॥१८॥ परासी न द्यावें दुःख । परपीडेपरी नाहीं पातक । यालागीं साधु सज्ञान लोक । प्राणांतीं दुःख न देती ॥ १९ ॥ जो प्राणी जन्मा आला । तो गर्भींच जाण मेला । याकारणें साधुमेळा । निःसंग होऊनि रहातसे ॥ २० ॥ नद्या पर्जन्यें भरोनि येती । तेणें सिंधु प्रवाहेना क्षितीं । उष्णकाळीं नद्या सुकती । तेणें अपांपती आटेना ॥ २१ ॥

—भावार्थरामायण.

नानासरितांचे खळाळ । आणूनि घालिती समळजळ ।
तो तिळभरी नव्हे डहुळ । अति निर्मळ निजांगें ॥ २२ ॥

—भागवत.

शुभानंदः— **ओंव्या.**

साधुपुरुषाचें वर्तन । करितां अंगुष्ठच्छेदन । न बोलती उद्वेगवचन । शांति संपूर्ण या नामें ॥ २३ ॥ सुखदुःख समान दोन्ही । निंदास्तुति मानापमानीं । तितिक्षा ऐसें त्यातें ज्ञानी । साधुजनीं बोलिजे ॥ २४ ॥ आपण केले उपकार । दुर्जनें केले कोटि अपकार । न गणी न करी उच्चार । उपरती नर सज्जनीं ॥ २५ ॥ राहो ना तरी जावो प्राण । परी जो न ढळे नेमासन । तो नर अध्यात्मसंपन्न । ऐसें ज्ञानी बोलती ॥ २६ ॥ आपणा लाभ परातें हानी । इच्छुनी वर्तती सकळ प्राणी । सर्वांचें कल्याण मनीं मानी । तो एक विरळा धर्मात्मा ॥ २७ ॥

—उद्योगपर्व.

महीपतिः— **ओंव्या.**

दुराचारी अज्ञानजन । समूळ वेष्टिले अविद्येंकरूनि । त्याचें करावया उद्धरण । साधुजन हिंडती ॥ २८ ॥ राजबिदींतूनि वारण । चालतां उदंड भुंकती

श्वान । परी तो ध्यानीं न आणून । करी गमन यथासुखें ॥ २९ ॥ कीं पंडितांचे सभे आंत । मूर्ख चावटी करी बहुत । तरी नायकोनि त्याची मात । पाहती शास्त्रार्थ निजदृष्टीं ॥ ३० ॥ नातरी अगस्ति मुनी देखोन । पयोब्धि अट्टहास्यें करी गर्जन । परी तें कांहीं ध्यानीं न आणून । करी अनुष्ठान निजनिष्ठें ॥ ३१ ॥ कीं विनतासुताचिया समोर । क्रोधें फोफावती विखार । परी तयासी भय अणुमात्र । न वाटेचि सर्वथा ॥ ३२ ॥

—भक्तिविजय.

मोरोपंतः—

## गीति.

सुकृतातेंचि स्मरति, न कुकृतातें याचि साधुरीतीची ।
रुचि रसिका, न सुधेची, कीं केवळ अल्प माधुरी तीची. ॥ ३३ ॥
छळकासि कवि न शापिति, देतें जड कनक काय हो! गाळी? ।
पाळी जो त्यास मधुर इक्षु, तसा त्याहि अदय जो गाळी ॥ ३४ ॥
सदय हितकाम जो, त्या असमंजस कर्म पाहवेना गा! ।
कैसें लावूं द्यावें पद, ज्या लंघन न साहवे नागा. ॥ ३५
रवि न ढळेचि, गिळी परि उगळी खळ मळिन मंद राहु टळे; ।
गुर्वापदेंहि साधु न भी, न चळे, जेंवि अचळ वाहुटळे. ॥ ३६ ॥
सुखदुःखप्राप्तीनें कवि हर्षविषाद लेश न धरीती, ।
वर्षावर्षीं जेवीं वृद्धिक्षय सिंधु; हेचि बुधरीती. ॥ ३७ ॥
पंकांत पद्म न मळे; काकाच्या दुर्गुणा शिवे न पिक; ।
चंदन परगंध न घे; होय तृणामाजिं तृणची काय पिक? ॥ ३८ ॥
विसराति अपकारांतें, उपकारांतेंचि साधु आठविती; ।
बा! सोशितां न सा विति होय वपु, न सोशितां न आठ विती. ॥३९॥
स्वकरें कापुनि देतां निज मांसहि, उबगला न शिबि कांहीं; ।
सुख साधुरीतिंहीं जें दिधलें श्रांतांस, तें न शिबिकांहीं ॥ ४० ॥

साधू मन न परहिताचरणीं, घडल्याहि मरण, तळमळवी. ।
मदकर्दमीं न सन्मति तिळभर डावेंहि चरणतळ मळवी. ॥ ४१ ॥

—स्फुट.

वामनः— श्लोक

वाणी खरी, दान बरें, अहिंसा, । नसे परद्रव्य सती पिपासा ।
दया, अतृष्णा, नतिभाव जो कां, । सन्मार्ग हा धोपट सर्व लोकां ॥४२॥

विपत्काळीं धैर्य, प्रभुपणिं सहिष्णुत्व बरवें ।
सभे पांडित्याचा प्रसर, समरीं शौर्य मिरवे ।
स्वकीर्तीच्या ठायीं प्रचुररति, विद्या व्यसन जें ।
तयांचे हे स्वाभाविक गुण सहा, सत्पुरुष जे ॥ ४३ ॥

वानोत, निंदोत, सुनीतिमंत । चलो, असो वा कमला घरांत ॥
हो मृत्यु आजीच घडो युगांतीं । सन्मार्ग टाकूनि भले न जाती ॥ ४४ ॥

सुनीतिपथ सेवणें, मलिन कर्म मानेंचिना ।
घडो मरण, नावडे खलजनांप्रति प्रार्थना ॥
विपत्तिसमयीं परि प्रकटवीचना दीनता ।
भल्याविण असें असिव्रत करूं शके कोणता ? ॥ ४५ ॥

ज्यांची देहमनें, तशीच वचनें पुण्यामृतें ओतिलीं ।
कीं जेंहीं स्वकृतोपकारविभवें सर्वत्र विस्तारिलीं ।।
लोकांचे परमाणुतुल्य गुण जे मेरूपरी वानिती; ।
चित्तीं तोषहि पावती, सुजन ते नेणों किती नांदती ॥४६॥

संपत्काळीं कोंवळीं सज्जनाचीं । होती चित्तें जातिपंकेरुहाचीं ॥
आपत्काळीं शैलही आदळों कां, । धाकेना जें गाजवी धैर्यडंका ॥ ४७ ॥

दे दान गुप्त; उपकार करी, न बोले । मानी प्रमोद, जरि मान्य घरास आले ॥
दावी न गर्व विभवें गुण घे पराचे । खड्गाग्रतुल्य विषम व्रत हें भल्याचें ४८

कीं तोडिला तरु फुटे अणखी भरानें । तो क्षीणही विधु महोन्नति घे क्रमानें ॥
जाणोनि हे, सुजन ज्या दुबळीक आली । त्याशी कदा न करिती सहसा टवाळी४९

आली जरी कष्टदशा अपार । न टाकिती धैर्य तथापि थोर ॥
केला जरी पोत बळेंचि खालें । ज्वाळा तरी ते वरती उफाळे ॥ ५० ॥
करीं साजे त्याग श्रवणयुगलीं सच्छ्रवण जें, ।
मुखीं सत्य, स्वच्छाचरण विलसे, शौर्यहि भुजे ॥
स्वशीर्षें थोराला नमन विभवावांचुनि पहा ।
भल्याचा कीं स्वाभाविक शुभ अलंकार विधि हा ॥ ५१ ॥

—नीतिशतक.

## २१ राजमान्य.

मुक्तेश्वरः—

ओंव्या.

नाम रूप थोरपण । कोणा न कळों द्यावें ज्ञान । दीनाहूनि परमदीन । ऐसें लोकां दाखवावें ॥ १ ॥ दावुनी चातुर्य कुशळते । मूर्खत्व नाणिजे प्रभूतें । श्रेष्ठ बोलिजे न घडे तें । तेचि शब्दीं प्रतिष्ठा ॥ २ ॥ असत्य न बोलिजे सर्वथा । धरिजे निर्लोभ निर्मळता । इंद्रियनियमीं नित्य वसतां । तोचि वल्लभ रायातें ॥३॥ राजस्त्रीसंवाद । राजमित्राशीं विरोध । राजपुरोहिताशीं विनोद ॥ जाणते पुरुषीं न करावा ॥ ४ ॥ राजा अचाट काम सांगे । न करवे म्हणोनि न येइजे मागें । स्वभाव ओळखूनि जो वागे ॥ तोचि वल्लभ रायातें ॥ ५ ॥ मागां सरे अंतःपुरीं॥ पुढां ठाके रणचत्वरीं । दिली आज्ञा वंदी शिरीं । तोचि वल्लभ रायातें ॥६॥ कीजे सर्वांचें आर्जव । कोठें न दाखवी वक्रभाव । सर्वांपासोनि गौरव । तोचि पावे निर्धारें ॥ ७ ॥ करणी करोनियां लपवी । महिमा दुजियाची वाढवी । महायशाची तो पदवी । आपेंआप पावत ॥ ८ ॥ रायें नेमलिये व्यापारीं । सावधान अहोरात्रीं । आळस निद्रा दवडूनि दुरी । तोचि रायातें आवडे ॥ ९ ॥ झालिया मानापमान । हर्षविषादीं न घाली मन । क्षमाशीळ सुप्रसन्न । तोचि पावे महिमेतें ॥ १० ॥ राजपैशून्य नायके कानीं । राजनिंदा न बोले वदनीं । राजमान्यातें सन्मानी । तोचि मान्य नृपातें ॥११॥ पुसल्याविणें न करी काज । संतुष्टकालीं न मनी लाज । राजगौरवें न चढे माज । तोचि पावे महिमेतें ॥ १२ ॥ प्रभूनें

बोलविल्या बोलणें । प्रभू पुसेल तें सांगणें । न पाचारितां न जाणें । तोचि पावे प्रतिष्ठा ॥ १३ ॥ राजासनीं राजवहनीं । राजाचिया एकांत सदनीं । बैसका न करी तो षड्गुणी । मान पावे नृपाचा ॥ १४ ॥ आपुलें प्रकट्टं नेदी ज्ञान । नेणत्यातें न म्हणे जो अज्ञान । ज्याचिये मुखीं मधुरवचन । तोचि मान्य विश्वातें॥ १५॥

—विराटपर्व.

श्रीधर—

### ओंव्या.

बोलणें कोमल विनयता । स्नेहेंकरून केली आप्तता । सत्यप्रिय भाषणनम्रता । त्या वश्य सर्व प्राणी ॥१६॥ सहनशीळ आणि सत्य । तेणें विश्व जिंकिलें समस्त । एवं सर्व गुण पांडव भरित । म्हणूनि वंद्य विश्वातें ॥१७॥ सर्वांभूतीं दया समान । देवहीं वंदिती त्याचे चरण । वृत्ति जाहली निरभिमान । तरी तो मान्य हरिहरां॥१८॥

—पांडवप्रताप.

---

## २२ मूर्खपण.

मुक्तेश्वरः—

### ओंव्या.

मी श्रेष्ठ श्रेष्ठाचा कुमर । धरी विद्येचा अहंकार । सुज्ञ सुविद्या न करी नर । तो शतमूर्ख जाणावा ॥ १ ॥ साखरेतें स्वादिष्ट करणें । कर्पुरातें सुवास देणें । चतुरपुरुषातें शिकविणें । हेचि नेणिव सांगतिया ॥ २ ॥ नलगे अवज्ञेचा पावो । तंवचि आसनीं सेविजे रावो । सोसोनि मानहानीचा घावो । लाभ इच्छी तो महामूर्ख ॥ ३ ॥ कारणेंवीण वाढवी द्वेष । ऐश्वर्य नसतां म्हणवी ईश । पुरुषांमाजी अधम पुरुष । ऐसें ज्ञाते बोलती ॥ ४ ॥ विद्यामदें वाढवी मान । तोचि फळे होवोनि अवमान । निस्तेज म्हणतां हुताशन । प्राणनाश पतंगा ॥ ५ ॥ सिंहासन्मुख मुक्ताफळें । दावितां भंगिती कुंभस्थळें । कस्तूरीचेनि परिमळें । हरिण व्याधा हिणावी ॥ ६ ॥ मद्यप्याहातीं नागवें खड्ग । झाडितां निवटी आपलें आंग । तेविं अहंकार मिरवितां चांग । मूळ होय नाशातें ॥ ७ ॥

—आदिपर्व.

शुभानंदः— ओंव्या.

एक ग्रासीं आवश्यक। आपुलाचि जाणे स्वार्थ एक। एक भोजनीं मानी सुख। तोचि मूर्ख पापात्मा ॥ ८ ॥ सर्वकाळ श्रद्धारहित। नेणे धर्मनिरोपणपंथ। कथाश्रवणीं नाहीं चित्त। तोचि मूर्ख दुरात्मा ॥ ९ ॥ स्वधर्म आपला सांडोन। होवोनि वर्ते विषयाधीन। परस्त्रीं परधनीं घाली मन। तोचि मूर्ख दुरात्मा ॥ १० ॥ जेथ अविद्या कल्पना। आवडी नसे ईश्वरभजना। नायके श्रेष्ठांच्या वचना। तोचि मूर्ख दुरात्मा ॥ ११ ॥ सदा प्रवृत्ति कल्पी चित्तीं। विषय सेवितां अतृप्ती। चित्तीं वसे विषयभक्ति। तोचि मूर्ख दुरात्मा ॥ १२ ॥ स्पर्धा करी बळिष्ठातें। बळ न तुळे आपुल्या चित्तें। अकारण उदित होय मरणातें। तोचि मूर्ख दुरात्मा ॥ १३ ॥ परस्त्री परहित अपहार। करावया कुशळत्व फार। ईश्वरभजनीं अनादर। तोचि मूर्ख दुरात्मा ॥ १४ ॥ मानी संसार शाश्वत। त्या त्या ऐसे करी विषयस्वार्थ। न स्मरे नेणे काळ, अपघात। तोचि मूर्ख दुरात्मा ॥ १५ ॥ साधुगुरूची निंदा करी। देवब्राह्मणद्वेष करी। मिथ्याभिमान वाहे शरीरीं। तोचि कुपुत्र दुरात्मा ॥ १६ ॥ सांडोनि अनादि कुळाचार। आचरे परधर्म अनाचार। परनिंदानुवादें जागे वक्र। तोचि मूर्ख दुरात्मा ॥ १७ ॥ सायासें एक मिळवीतसे। लाधलें तें सर्वा सरिसें। तेथ देहलोभ करी विशेषें। तोचि मूर्ख दुरात्मा ॥ १८ ॥ भक्ष्य भक्षित पंथीं चाले। हांसत हांसत मुखें बोले। दोघे बोलतां ऐकों चाले। तो शतमूर्ख दुरात्मा ॥ १९ ॥ श्रेष्ठीं वर्जितां करी दुष्कृती। कर्म प्रतिष्ठी अनाहुतीं। जपतपकर्मी अश्रद्धा हितीं। तोचि मूर्ख दुरात्मा ॥ २० ॥ आपण प्रतिष्ठित म्हणोन। करी अन्याय आचरण। धर्मनीति करी खंडण। तोचि पाषाण दुरात्मा ॥ २१ ॥ आपणामाजी दैवेंकरून। येकदा झाला संपन्न। त्यावरी अनहित कल्पी मन। तोचि पाषाण पापात्मा ॥ २२ ॥ येवोनियां नरशरीरीं। आपुली आपण वोळखी न करीं। विषयीं लोळे श्वानापरी। तो निर्धारीं दुरात्मा ॥ २३ ॥ सदा कुपथ्यभोजन। निंदी देव साधु ब्राह्मण। ऐसेया पापात्मया अकाळमरण। लिहिलेंसे विधानें ॥ २४ ॥ एक वर्ततां अनाचारें। जरी आपणा ठावें होउनि सरे। तों उघड करी परस्परें। तोचि मूर्ख दुरात्मा ॥ २५ ॥

—उद्योगपर्व.

श्रीधर :— ओंव्या.

आद्यंत न पाहतां अर्थ । द्वेषें दोष ठेवी अकस्मात । जाणिजे तो शतमूर्ख निश्चित । नव्हे पंडित विवेकी ॥ २६ ॥ केवढी खळ आहे आपुली बुद्धि । महाचतुरांचे ग्रंथ निंदी । नसता दोष ठेवी कुबुद्धी । तो पडेल बंदीं यमाचे ॥ २७ ॥

—पांडवप्रताप.

मोरोपंत:— गीति.

जिष्णु म्हणे, " न बहातां जातात्ति महाजनांत दाटूनी, ।
बोलतिहि न बोलवितां, ते घडिले मूर्खकोटि वाटूनी." ॥ २८ ॥
मुग्धपणें पंगु म्हणे जरि, ' करितों हेमभूधरारूढ; ' ।
तद्विश्वासें जो जन परिकर बांधील तो खरा मूढ. ॥ २९ ॥
विद्या नसोनि उद्धत, धन नसतां जो उदारपण वाहे, ।
अर्थासि नीच कर्में जो संपादावयासि जन पाहे, ॥ ३० ॥
नसतां लाभ यशाचा दाटून करी परार्थ जो यत्न, ।
मित्रार्थी कपट करी, तो साक्षान्मूढजनशिरोरत्न. ॥ ३१ ॥
मित्रत्व दे अमित्रा, जो मित्रद्वेष दुष्ट कर्म करी, ।
तो मूर्ख, असें म्हणती पुरुष परीक्षा कळे जयांस बरी. ॥ ३२ ॥

—स्फुट

## २३ उद्योग व आळस.

मुक्तेश्वर :— ओंव्या.

वेळेसारखें यश अपेश । याचा न कांहीं कीजे क्लेश । अनालस्यें दिवसेंदिवस । वृद्धि कीजे बळाची ॥ १ ॥ वारंवार पडतां क्षिती । शेवटीं कीटक चढे भिंती । खणत खणत पर्वतीं । खचोनि जाय एकदां ॥ २ ॥

—आदिपर्व.

शेळीगळींचे गळस्तन । तेवीं पुरुष करणीहीन ।
स्मशानींचें भग्न भाजन । जळो जिणें तयाचें ॥ ३ ॥

—विराटपर्व.

श्रीधरः— **ओंवी.**

जय अथवा पराजय । महावीरांसी पडे हा समय ।
पुरुषें पुरुषार्थ सांडूं नये । करावा उपाय मागुती ॥ ४ ॥

—हरिविजय.

एकनाथः— **ओंवी.**

आळस सांडोनि संभ्रम । त्यजोनि विषयविषकाम । प्रयत्न करितां पैं परम । परब्रह्म आतुडे ॥ ५ ॥ प्रयत्न करोनि विचक्षण । वैकुंठवासी होय पूर्ण । शेषशायी नारायण । होती आपण अति प्रयत्नें ॥ ६ ॥

—भावार्थरामायण.

शुभानंदः— **ओंव्या.**

जैसा एकचक्र रथ । क्रमण करावया नव्हे पंथ । तैसा देवें नेमस्त । प्रयत्नावीण निर्मिला ॥ ७ ॥ प्रयत्न म्हणजे दुजें चक्र । लागतां गमनीं झाला सत्वर । यत्नाविना दैव थोर । परी तें होय निर्फळ ॥ ८ ॥ उद्योग केल्याविना कांहीं । तोचि प्रेत जिता पाहीं । अपायीं अथवा उपायीं । करणी बापा त्यागूं नये ॥ ९ ॥ कर्तृत्वहीन नर संसारीं । नव्हे पुरुष न तो नारी । जंववरी प्राण वर्ते शरीरीं । तंववरी करणी न त्यागिजे ॥ १० ॥ मी मरेन हें सांडी मनीं । सती जैशी पडे यज्ञीं । तैसा देह हुताशनीं । संसारीं लोटी कर्तृत्वीं ॥ ११ ॥ तेव्हां तया आलेया हाण । ते नव्हे हाणी साधिलें पुण्य । सहजें सफल झालेया यत्न । सर्व संपत्ति सांपडे ॥ १२ ॥

—उद्योगपर्व.

वामनः— **श्लोक.**

आलस्य जें कार्यविघातकारी, । असूं नये तो रिपु या शरीरीं; ॥
उद्योग सद्बंधु तया न टाकीं, । त्या सेवितां पावसि सौख्य लोकीं. ॥१३॥

मोरोपंतः— **गीति.**

अश्वतर म्हणे, "सुत हो ! जरि जन जाणुनि अशक्य कर्मातें ।
न करितिल, अनुद्योगें पावतिल न कार्यसिद्धिशर्मातें. ॥ १४ ॥

पुरुषें आरंभावें कर्म, न पौरुष कदापि सोडावें ; ।
कर्मफळ जसें दैवें, स्पष्ट तसें पौरुषेंहि जोडावें." ॥ १५ ॥
उत्साहें वीरांहीं करुनि विकत्थन यथेच्छ गर्जावें ; ।
फल न दिसतां बुधांहीं काय प्रारब्ध कर्म वर्जावें ? ॥ १६ ॥

—मदालसाख्यान.

स्वामी ! वैरी कोण ? च्छात्रा ! तो शत्रु जो अनुद्योग ।
ज्या उद्योगाभावें पावति विलयास सर्व सुखभोग. ॥ १७ ॥

—प्रश्नोत्तरमाला.

शुभानंदः— ओंव्या.

आळसियातें नाहीं सुख । उभयलोकीं पावे दुःख । आलस्यें कर्म निरर्थक । जन्मा आलेया संसारीं ॥ १८ ॥ आलस्यें वित्तीं होय नाश । इहत्रीं नाहीं सुख तयास । आळसें मुक्तिपंथ वोस । निरयवास सहजेंचि ॥ १९ ॥ आलस्यें करितां संध्यावंदना । काळें ढळतां कुरुनंदना । नागवला सुकृतधना । दोषबंधना सांपडला ॥२०॥ आळसें न करी व्रत तपें नेम । आळसें न करी तीर्थादि श्रम । आळसें विमुख सर्व धर्म । जितां प्रेत आळसी ॥ २१ ॥ आळसें न जाये हरि-कीर्तना । आळसें न बसे कथाश्रवणा । दिवसरात्री लुब्धला शयना । प्रेतमान जिता तो ॥ २२ ॥

—उद्योगपर्व.

---

## २४ सद्गुरूचें लक्षण व माहात्म्य.

एकनाथः— ओंव्या.

सद्गुरूची स्थिति ऐशी । स्वयें अनुभवणें ज्या सुखासी । तेविं पावे शिष्यासी । न्यूनाधिकासी न करोनी ॥ १ ॥ पित्याचें समस्त वित्त । पुत्र स्वामित्वें अंगी-कारित । तैसें सद्गुरुसुख समस्त । शिष्य आक्रमित भावार्थें ॥ २ ॥ संसार-सागरीं बुडतां । सद्गुरुवांचोनि तरतां । आन नाहीं सोडवितां । सत्य वार्ता हे माझी ॥ ३ ॥ जेथें गुरुआज्ञापरिपाळण । तेथें सर्वदा विजय पूर्ण । गुरु

संरक्षिता आपण । निजगणा विघ्न शिवों नेदी ॥ ४ ॥ सद्गुरूसी न रिघतां शरण । कदा न सुटे देहबंधन । तया नरा अधःपतन । पापिया पूर्ण तो सृष्टीं ॥ ५ ॥

—भावार्थरामायण.

वामनः— ओंव्या.

आतां असोनीही अनुभव । ज्यास नाहीं शास्त्रवैभव । ते चुकविती आपला पुनर्भव । परि उद्धरूं न शक्ती मुमुक्षूंतें ॥ ६ ॥ शिष्यसंदेह न शके हरूं । तो अनुभवीही न म्हणवे गुरू । कल्पिले पदार्थ नेदी तरू । तो कल्पतरू कैसा म्हणावा ? ॥ ७ ॥ म्हणोनी शास्त्रज्ञ आणि अनुभवी । साजे त्याला गुरुत्वपदवी । तोचि जगद्गुरु गोसावी । कीं शास्त्रज्ञ आणि अनुभवीं परिपक्व ॥८॥ तैसाच शास्त्राविण । जरी अनुभवी झाला ब्राह्मण । न साजे त्याला गुरुपण । कीं शिष्यसंदेह न हरी ॥९॥ त्यांतही गुरुसेवातत्पर । गुरूच साक्षात् सर्वेश्वर । ऐसें मानूनि जे सादर । सेविती श्रीगुरूतें ॥१०॥ त्यास सच्छास्त्रपठण । नसोनिही होय सर्व शास्त्रज्ञान । श्रीगुरूचें मन । प्रसन्न झालें त्यावरी ॥११॥ श्रीगुरूच्या कळा । यत्न न करितां पावे सकळा । अंजन घालितां डोळां । पदोपदीं निधानें॥१२॥किंबहुना एकलव्य या नांवें । जातीचा कोळीही भक्तिभावें । गुरुप्रतिमापूजाप्रभावें । रहस्यविद्या गुरूची पावला ॥१३॥ हे आदिपर्वीं भारतीं कथा । विस्तारितां वृद्धि होणार ग्रंथा । एवं गुरु-शुश्रूषा सर्वथा । गुरुसामर्थ्य संपादी शिष्यातें ॥१४॥ परंतु गुरु असावा भला । तरीच भलेपण प्राप्त होय शिष्याला । बौद्ध गुरु सद्भावें सेविला । तरी प्रौढ बौद्धच होणार ॥१५॥ ज्याची धरावी संगती । तो जाईल ज्या गांवाप्रती । त्याचे आश्रित हो पावती । त्याच गांवासी ॥१६॥ वेदविरुद्ध अनुष्ठान । तेंचि नरकाचें साधन । त्या गुरुसंगतीनें शिष्यजन । जाती तथा नरकासी ॥१७॥ एवं गुरु असेल जैसा । शिष्यही होईल तैसा । गुरुविश्वास तरि तो ऐसा । समजोनि गुरु करावा बाबा हो ! ॥१८॥ याकारणें गुरू । अनुभवसुखाचा कल्पतरू । वेदजंबुद्वीपाचा मेरू । तोचि सेवावा ॥१९॥ त्यांत कोणांस अनुभव मात्र । कोणांस अनुभव हो शास्त्र । गुरु-

सेवेनेंच दोन्ही नेत्र । प्राप्त होती ॥२०॥ एवं अनुभवी आणि शास्त्रज्ञ । तोचि गुरु सर्वज्ञ । शास्त्र नसोनिही शास्त्ररहस्याभिज्ञ । तोही योग्य गुरुत्वासी ॥२१॥ कीं शिष्याचे संदेह । निरसूनि करी निःसंदेह । शास्त्र न पढोनिही निर्वाह । करी शिष्यप्रश्नाचा ॥ २२ ॥ तरी शास्त्रज्ञता यथामती । ओळखेल परंतु अनुभवस्थिती । शिष्यासि कळे कवणे रीती । अंध केवी जाणे डोळे डोळसाचे ? ॥२३॥ अंध डोळ्यांकारणें । डोळसा वैद्यास गेला शरण । तो डोळे देतां डोळसपण । सहजचि त्याचे दृष्टीं पडेल ॥ २४ ॥

—यथार्थदीपिका.

मोरोपंतः—

**गीति.**

गुरुकर्णधार त्याची सुदृढा तत्त्वोपदेशवाक् सुतरी ।
धरुनि भवाम्बुधि तरले बहुविध, तत्कीर्तिही जना उतरी. ॥ २५ ॥
गुरुला शरण न जातां अध्ययन श्रम न भोगितां शास्त्र ।
कैचें कार्याकार्यज्ञाना शास्त्राविणें नव्हे पात्र. ॥ २६ ॥
गुरुकरचि शिरोरक्षक, भारावह काय ओखटा टोप ? ।
गुरुवर सहाय असतां, व्हावा काशास हो खटाटोप ? ॥ २७ ॥
गुरुराज जनक, जननी, बंधु, सुहृन्मित्र, सोयरे, स्वजन, ।
भजन श्रीगुरुचें तें गंगावाराणसीगयात्रजन. ॥ २८ ॥
कडियेवरि नच घेतां स्तन्यामृत काय बाळ कवळील ? ।
स्तवन असोचि, गुरुदया नसतां जड पशुहि नीट न वळील. ॥२९॥
सद्गुरुवांचुनि वांचुनि विफळ जिणें, यांत वांकडें काय ? ।
शुक सांगे, 'भागविला कृष्णें वाहून लांकडें काय !' ॥ ३० ॥
सद्गुरुअनुग्रहाविण हरिला तो कठिण सर्वथा पटणें ।
गोरा संत परीक्षी मस्तकिं हाणूनि सर्व थापटणें. ॥ ३१ ॥

—स्फुट.

वामनः—

**सवाया.**

वैभव हें क्षणभंगुर केवळ दोंप्रहरीं जशि चंचल छाया ।
आप्तजनें असती परि शेवटिं कोणिहि सिद्ध नव्हे समजाया. ॥

दुर्घट हा भवसागर दुस्तर कोण करील तयासि उपाय ।
होई तरी शरणागत स्वागत लक्षुनियां धरिं श्रीगुरुपायां. ॥ ३२ ॥
सिंह जसे प्रतिपर्वति नाहिंत, कस्तुरिएण वनोवनिं कैचे ? ।
हस्तिच मस्तकिं मुक्त असे परि ते गजराजहि प्रस्तुत कैचे ? ॥
कल्पतरू आणि कामदुघा बहुसाळ परीसहि पद्मणिं कैचे ? ।
तेविंच [ निर्मळ ] सद्गुरु सज्जन सन्त महान घरोघरिं कैचे. ॥३३॥

—स्फुट.

---

## २८ गुरुदास्य.

**मोरोपंतः—**

### गीति.

जरि गुरुसेवेसि न घे, शिष्यें अर्थंकरुनि तरि त्यातें ।
प्रार्थूनि तोषवावें अहितसमज्ञानबीज हरित्यातें. ॥ १ ॥
मर्यादा पाळावी, निजशिव गुरुचेचि पाय, रीतीतें ।
सांडूं नये, म्हणति कवि, 'साधुपदाचीच पायरी' तीर्ते. ॥ २ ॥
कैसाहि असो गुरु, बहु मान्यचि, चित्तेंहि लंघ्य न भल्याला ; ।
पूज्यचि दक्षमखान्तक, जन्हि अस्थि, भुजंग, भस्म, नभ ल्याला.॥३॥
स्वर्गपद, ब्रह्मपदहि, किंबहुना मोक्षपदहि सोडावें ; ।
श्रीगुरुपदचि म्हणति कवि, सर्वस्वार्पण करून, जोडावें. ॥ ४ ॥
अपमानें गुरुचा वध होतो, शस्त्राविणेंचि तूंकारें ; ।
हेंचि अथर्वांगिरसीं श्रुति सांगे मानदान हुंकारें. ॥ ५ ॥
सच्छिष्य मीनसे त्या सेव्यचि आचार्यचरण अर्णवसे ; ।
श्रीगुरुचे उतराई व्हाया नमनाविणें उपाय नसे. ॥ ६ ॥
सादर भजनें घडतो सर्वार्थांउपरि तो खरा होतो, ।
मेरुवितरणेंहि तसा गुरुसि नव्हे सुपरितोख राहो तो. ॥ ७ ॥
अनुभावें न जितावे, भावें गुरुदेव सर्वथा पटुनीं ; ।
उठविति अनर्थ खिजतां, रिझतां पुरुषार्थ सर्व थापटुनी. ॥ ८ ॥

—स्फुट.

रामदास :—　　　　　　　　**ओंव्या.**

जयजयाजी ! सद्गुरुराजा ! । विश्वंभरा ! विश्वबीजा ! । परमपुरुषा मोक्षध्वजा । दीनबंधू ॥ ९ ॥ तुझियेनि अभयकरें । अनावर हे माया ओसरे । जैसें सूर्यप्रकाशें आंधारें । पळोनि जाय. ॥ १० ॥ आदित्यें अंधकार निवारे । परी मागुतें ब्रह्मांड भरे । निशी झालियानंतरें । पुनः काळोखें ॥ ११ ॥ तैसें नव्हे स्वामीराव । करी जन्ममृत्यूचा वाव । समूळ अज्ञानाचा ठाव । पुसून टाकी.॥१२॥ सुवर्णाचें लोह कांहीं । सर्वथा होणार नाहीं । तैसा गुरुदास संदेही । पडोचि नेणे सर्वथा. ॥ १३ ॥ का सरिता गंगेसि मिळाली । मिळणी होतां गंगाचि झाली । मग जरी वेगळी केली । तरी होणार नाहीं सर्वथा ॥ १४ ॥ परि ती सरिता मिळणीमागें । वोहोळ मानिजे ती जगें । तैसा नोहे शिष्य वेगें । स्वामीचि होय. ॥ १५ ॥ परीस आपणा ऐसें करीना । सुवर्णें लोह पालटेना । उपदेश करीत बहुजना । अंकित सद्गुरूचा. ॥ १६ ॥ उपमे द्यावा सागर । तरी तो अत्यंताचि क्षार । अथवा म्हणों क्षीरसागर । तरी नासेल कल्पान्तीं ॥ १७ ॥ उपमे द्यावा जरी मेरू । तरी तो जडपाषाण कठोरू । तैसा नव्हे कीं सद्गुरू । परम कोमळ दीनाचा. ॥ १८ ॥ उपमेस द्यावें गगन । परी गगनापरीस तो निर्गुण । याकारणें दृष्टांत हीन । सद्गुरूसि गगनाचा. ॥ १९ ॥ धीरपणें उपमूं जगतां । तरी हेंही खचेल कल्पांतीं । म्हणोनि धीरत्वास दृष्टांतीं । हीन वसुंधरा. ॥ २० ॥ आतां उपमेस द्यावा गभस्ती । तरी गभस्तीचा प्रकाश किती ? । शास्त्रें मर्यादा बोलती । सद्गुरू तों अमर्याद ॥ २१ ॥ म्हणोनि उपमेस उणा दिनकर । सद्गुरु ज्ञानप्रकाश थोर । आतां उपमावा फणिवर । तरी तो भारवाही. ॥ २२ ॥ आतां उपमेस द्यावें जळ । तरी तें कालांतरें आटेल सकळ । सद्गुरुरूप तें निश्चळ । जाणार नाहीं. ॥ २३ ॥ सद्गुरूस उपमावें अमृत । तरी अमर धरिती मृत्युपंथ । सद्गुरूकृपा यथार्थ । अमराचि करी ॥ २४ ॥ सद्गुरूसि म्हणावें कल्पतरू । तरी हा कल्पनातीत विचारू । कल्पवृक्षाचा अंगीकारू । कोण करी ? ॥ २५ ॥ चिंतामात्र नसे मनीं । कोण पुसे चिंतामणी । कामधे-

नूची दुभणी । निष्कामास न लगती ॥ २६ ॥ सद्गुरूस म्हणों लक्ष्मीवंत । तरी ती लक्ष्मी नाशवंत । ज्याचे द्वारीं असे तिष्ठत । मोक्षलक्ष्मी. ॥ २७ ॥ स्वर्गलोक इंद्रसंपत्ती । हे काळांतरें विटंबती । सद्गुरूकृपेची प्राप्ती । काळांतरीं चळेना. ॥ २८ ॥ तयास उपमा काय द्यावी ? । नाशवंत सृष्टी आघवी । पंचभौक्तिक उठाठेवी । न चले तेथें. ॥ २९ ॥ म्हणोनि सद्गुरू वर्णवेना । हेंग हेचि माझी वर्णना । अंतरस्थितीचिया खुणा । अंतर्निष्ठ जाणती. ॥ ३० ॥

—दासबोध.

श्रीधरः—

## ओंव्या.

आत्मप्राप्तीस कारण । धरावे श्रीगुरूचे चरण । गुरुकृपेवीण ज्ञान । कल्पांतींही साधेना ॥३१॥ पदार्थ न दिसे नेत्रेंवीण । मोड न वाढे जीवनावीण । परिसावीण सुवर्ण । लोहाचें नोहे सर्वथा ॥ ३२ ॥ जो गुरुसेवेसी सादर । आत्मज्ञानें जोडूनि कर । उभा त्यापुढें निरंतर । अहोरात्र तिष्ठतसे ॥३३॥ गुरुसेवा जयासी नावडे । त्याचे ज्ञानासी पडले किडे । जन्ममरणांचें सांकडें । न सरे त्याचें कल्पांतीं ॥ ३४ ॥ जयासी नावडे गुरुसेवन । तो झाला चतुःषष्ठिकळाप्रवीण । साही शास्त्रें मुखोद्गत पूर्ण । परी तें भाषण मद्यपियाचें ॥ ३५ ॥ तेणें केलें जरी कीर्तन । दावी वरपांग डोलून । परी गुरुदास्य नावडे पूर्ण । त्यास बंधन चुकेना ॥ ३६ ॥ जळो त्याचा प्रताप । काय चाटावें कोरडें तप । जैसें विगत-धवेचें स्वरूप । यौवन काय जाळावें ॥ ३७ ॥ गर्भांधाचें विशाळ नेत्र । अदा-तयाचें उंच मंदीर । कीं धनलुब्धाचा तत्वविचार । कीं रम्य गृह अंत्यजाचें॥३८॥ भ्रष्टासि काय कुळगोत्र । श्वान नेणे पवित्रापवित्र । जैसें मद्यपियाचें पात्र । श्रोत्रिय न शिवे सर्वथा ॥ ३९ ॥ तैसे गुरुकृपेवीण जे नर । ते देहासी आले जैसे खर । सदा विषयव्यापारीं सादर । आपपर नसे जयां ॥ ४० ॥ तनुधनमनेंसीं शरण । श्रीगुरूसी जो न भजे आपण । तो झाला जरी शास्त्रप्रवीण । न करितां गुरुभजन तरेना ॥ ४१ ॥ व्यर्थ गेलें तयाचें तप । जळो जळो तयाचा जप । व्यर्थ काय कोरडा प्रताप । गुरुवचन नावडे जया ॥ ४२ ॥ सद्गुरूचे घरीं आपदा । आपण भोगी सर्व संपदा । त्या अपवित्राचें मुख कदा । दृष्टी न पहावें कल्पांतीं ॥४३॥

—रामविजय.

जो सर्वज्ञ परिपूर्ण । ज्यासी नाहीं ज्ञानाभिमान । जो वेदाज्ञा मानी प्रमाण । त्यासी शरण आधीं जावें ॥ ४४ ॥ जो सर्वज्ञ दयाळ उदास । जो सदाचार-वृत्ति जैसा चंडांश । सर्वांभूतीं दया विशेष । त्यासी शरण आधीं जावें ॥ ४५ ॥ जो तरोनि दुसरियासी तारिता होये । शिष्य जो ब्रह्मरूप पाहे । मान-अपमानीं चित्त सम राहे । त्यासी शरण आधीं जावें ॥ ४६ ॥ आपण ज्यास विद्यादान केलें । ते शिष्य दुजिया शरण गेले । चित्त क्रोधें न खवळे । त्यासी शरण आधीं जावें ॥ ४७ ॥ जन झुगारिती निंदेचे पाषाण । पुढें केलें क्षमा वोडवण । मनांत नुपजे द्वेष पूर्ण । त्यासी शरण आधीं जावें ॥ ४८ ॥ पुत्राहूनि विशेष गाढें । शिष्यावरीं प्रेम चढे । जो शिष्या न घाली सांकडें । त्यासी शरण आधीं जावें ॥ ४९ ॥ वर्ते आपुल्या वर्णाश्रमेमेळीं । न चाले कदा वाकुडे पावुलीं । सदा आत्मरूपीं वृत्ति रंगली । त्यासी शरण आधीं जावें ॥ ५० ॥ पिंडब्रह्मांड नाशिवंत । आत्मरूप एक शाश्वत । हें जाणूनि सदा विरक्त । त्यासी शरण आधीं जावें ॥ ५१ ॥ शरीरप्रारब्ध भाग्य आलें । अथवा एकदाचि सर्व बुडालें । परि हर्षामर्षपंकें मन न मळे । त्यासी शरण आधीं जावें ॥ ५२ ॥ पिपीलिका आणि कमलासन । इंद्र आणि दरिद्री दीन । राजा रंक अवघे समान । त्यासी शरण आधीं जावें ॥ ५३ ॥ वैकुंठापासूनि नागपर्यंत । भूताकृति ज्या ज्या दिसत । त्या त्या हरिरूप भासत । त्यासी शरण आधीं जावें ॥ ५४ ॥ जैशा नाना घागरी आणि एक रांजण । त्यांत भासे एक चंडकिरण । तैसें ज्यास न दिसे स्त्रीपुरुषभान । त्यासी शरण आधीं जावें ॥ ५५ ॥ जो बोले चाले जनीं हिंडे । परी ज्याची समाधि न मोडे । वाद प्रतिवाद नावडे । त्यासी शरण आधीं जावें ॥ ५६ ॥ पृथ्वीचे राजे भाग्यवंत । नित्य ज्याच्या दर्शना येत । परी मी थोर हा नुपजे हेत । त्यासी शरण आधीं जावें ॥ ५७ ॥ भाग्यवंताचें करावें स्तवन । दीनदुर्बळांचें हेळण । हें ज्यापासीं नाहीं लक्षण । त्यासी शरण आधीं जावें ॥ ५८ ॥ प्रपंच जाहला किंवा नाहीं । हें स्मरण नसे कांहीं । जो बुडाला ब्रह्मानंदडोहीं । त्यासी शरण आधीं जावें ॥ ५९ ॥ इतुकिया लक्षणीं अलंकृत । ज्यासी गुरुभजनीं नित्य

हेत । प्रेमभरें सदा डुलत । त्यासी शरण आधीं जावें ॥ ६० ॥ ज्यासी हरिकीर्तनीं आवडी । संतदर्शना घाली उडी । तीर्थक्षेत्रमाहिमा न खंडी । त्यासी शरण आधीं जावें ॥ ६१ ॥

ज्यासी गुरुसेवा नावडे यथार्थ । काय जाळावा त्याचा परमार्थ । गुरुसेवेवीण विद्या समस्त । अविद्या होती जाणपां ॥ ६२ ॥ जो कंटाळे गुरुसेवेसी । किडे पडले त्याच्या ज्ञानासी । जो स्वामीस आपुल्या द्वेषी । तो महानरकीं जाईल ॥ ६३ ॥ सद्गुरूचें स्मरण न करी । नाठवी गुरुमूर्ति अंतरीं । तो बुडाला अघोरीं । चंद्रार्कवरी दुरात्मा ॥ ६४ ॥ सद्गुरूचें नाम सांगतां । लाज येत ज्याचिया चित्ता । त्या चांडाळाचें मुख देखतां । सचैल स्नान करावें ॥ ६५ ॥ गुरुचरणीं मन न ठेवितां । व्यर्थ काय चाटावी कविता । तो ज्ञान सांगे तें तत्वतां । मद्यपियाचें भाषण ॥ ६६ ॥

—हरिविजय.

---

## २६ सुशिष्य.

श्रीधरः— ओंव्या.

जे तनमनधनेसी शरण । गुरुवचन ज्यांसी प्रमाण । न पाहती गुरूचे दोषगुण । हेंचि लक्षण शिष्याचें ॥ १ ॥ गुरु सांगती तें आचरती । गुरुसमान आपण न म्हणती । दिवसेंदिवस चढे भक्ति । हेंचि लक्षण शिष्याचें ॥ २ ॥ गुरु हा केवळ ईश्वर । मजलागीं धरिला अवतार । ऐसा मनीं दृढ निर्धार । हेंचि लक्षण शिष्याचें ॥ ३ ॥ मी एक जाणता सर्वज्ञ । गुरुसन्निध न मिरवी योग्यतापण । घडोघडी आठवी गुरुचरण । हेंचि लक्षण शिष्याचें ॥ ४ ॥ सकळ देवांहूनि आगळें । गुरुस्वरूप जेणें निर्धारिलें । मन गुरुपदींच लंपट झालें । हेंचि लक्षण शिष्याचें ॥ ५ ॥ सारासारविचार । गुरुमुखें ऐकती निरंतर । आवडे अद्वैत शास्त्र कीं हरिचरित्र । हेंचि लक्षण शिष्याचें ॥ ६ ॥ गुरु सांगे जे विहित गोष्टी । ते सदा धरी हृदयसंपुटीं । प्रवृत्तिशास्त्रावरी नाहीं दृष्टी । हेंचि लक्षण शिष्याचें ॥ ७ ॥ गुरुनामस्मरणाचा ध्वज । अखंड उभा राहिला तेजःपुंज ।

गुरुसेवा करितां नुपजे लाज । हेंचि लक्षण शिष्याचें ॥८॥ गुरुतीर्थ करी प्राशन । सदा गुरुगौरवगायन । हरिगुरुरूप देखे समान । हेंचि लक्षण शिष्याचें ॥ ९ ॥ माझें शरीर असो बहुकाळ । मज गुरुसेवा घडो निर्मळ । गुरुभेटीलागीं उतावेळ । हेंचि लक्षण शिष्याचें ॥१०॥ गुरुनिंदा ऐकतां जाण । बोटें घालूनि बुजी कान । पुन्हा न पाहे त्याचें वदन । हेंचि लक्षण शिष्याचें ॥ ११ ॥ अद्भुत प्रज्ञा जवळी असे । चातुर्यकळा हृदयीं वसे । अंगीं सद्भाव विशेष दिसे । हेंचि लक्षण शिष्याचें॥१२॥ सर्वस्वेंसीं अति उदार । गुरुकार्यासी सदा सादर । लौकिकावरी नाहीं भार । हेंचि लक्षण शिष्याचें ॥ १३ ॥ जे देशीं वसे गुरुनाथ । तिकडूनि जरी आला मारुत । त्यासी क्षेम द्यावया धावत । हेंचि लक्षण शिष्याचें ॥ १४ ॥ नानामतें कुमार्गे अनाचारी । येथें न बैसे क्षणभरी । वेदाज्ञा वंदी जो शिरीं । हेंचि लक्षण शिष्याचें ॥ १५ ॥

—हरिविजय.

शुभानंदः— ओंव्या.

सद्गुरु पिता सद्गुरु माता । सद्गुरुवाक्य शास्त्र तत्वतां । सद्गुरुसेवेवीण सर्वथा । आन साधन नेणिजे ॥ १६ ॥ सद्गुरूसी इच्छा चित्तीं । तो ती पूर्ण करी सर्वशक्ति । गुरुभजनीं प्रेमरती । देहाभिमान पैं नेणे ॥ १७ ॥ स्वधर्म तो सद्गुरुध्यान । नाम सद्गुरूचें मुखीं पावन । सद्गुरुसेवा तें जीवन । नित्य पूजन गुरुपद ॥ १८ ॥ सद्गुरु भावी चंद्रमा । आपण होय चकोरसमा । सद्गुरु मेघाची उपमा । आपण होय चातक ॥ १९ ॥ सद्गुरु तो भास्कर एक । आपण सदा चक्रवाक । सद्गुरु चित्सूर्य देख । आपण कमळ विकासे ॥ २० ॥ सद्गुरु चंद्र षोडशकळा । आपण चंद्रकांत शिळा । दर्शनें स्मरणें झळझळां । पाणी होउनियां राहे ॥ २१ ॥ सद्गुरु तो जळधर । आपण नाचे मयूर । सद्गुरु मृगनाभी साकार । अंबररूपें आपण ॥ २२ ॥ सद्गुरु तो चुंबकशिळा । आपण झाला लोहखिळा । सद्गुरु शिष्य तो निश्चळा । भरे रत्नाकर सिंधुहोनी ॥ २३ ॥ सद्गुरुकृपामृतजळीं । आपण तरंग सुखकल्लोळीं । सद्गुरूसी अर्पिल्यावेगळीं । पदार्थमात्र सेवीना ॥ २४ ॥

—उद्योगपर्व.

वामनः—

**सवाई.**

शिष्य बहू गुरु मेळविती, परि दुर्लभ तो जगिं शिष्य करी, ।
ब्रह्मचि होउनि शेष उरे, तरि ते खुण शिष्यपणाचि खरी ; ॥
मंत्रहि देतिल जे शिकवीतिल नाटक, काव्य, कळा कुसरी ; ।
तेहि गुरू परि सद्गुरुवांचुनि शिष्यपणाचि असे न उरी. ॥ २५ ॥

रामदासः—

**ओंव्या.**

मुख्य सच्छिष्याचें लक्षण । सद्गुरुवचनीं विश्वास पूर्ण । अनन्यभावें शरण । त्या नांव सच्छिष्य ॥ २६ ॥ शिष्य पाहिजे निर्मळ । शिष्य पाहिजे आचारशीळ । शिष्य पाहिजे केवळ । विरक्त अनुतापी ॥ २७ ॥ शिष्य पाहिजे निष्ठावंत । शिष्य पाहिजे शुचिष्मंत । शिष्य पाहिजे नेमस्त । सर्व प्रकारीं ॥ २८ ॥ शिष्य पाहिजे साक्षेपी विशेष । शिष्य पाहिजे परम दक्ष । शिष्य पाहिजे अलक्ष्य । लक्षी ऐसा ॥ २९ ॥ शिष्य पाहिजे अतिधीर । शिष्य पाहिजे आति उदार । शिष्य पाहिजे अति तत्पर । परमार्थविषयीं ॥३०॥ शिष्य पाहिजे परोपकारी । शिष्य पाहिजे निर्मत्सरी । शिष्य पाहिजे अर्थांतरीं । प्रवेशकर्ता ॥३१॥ शिष्य पाहिजे परमशुद्ध । शिष्य पाहिजे परम सावध । शिष्य पाहिजे अगाध । उत्तम गुणांचा ॥ ३२॥ शिष्य पाहिजे प्रज्ञावंत । शिष्य पाहिजे प्रेमळ भक्त । शिष्य पाहिजे नीतिवंत । मर्यादेचा ॥३३॥ शिष्य पाहिजे युक्तिवंत । शिष्य पाहिजे बुद्धिवंत । शिष्य पाहिजे सतत । विचार घेता ॥३४॥ शिष्य पाहिजे धारिष्टाचा । शिष्य पाहिजे दृढ प्रतापाचा । शिष्य पाहिजे उत्तम कुळींचा । पुण्य॰ शीळ ॥ ३५ ॥ शिष्य असावा सात्विक । शिष्य असावा भजक । शिष्य असावा साधक । साधनकर्ता ॥ ३६ ॥ शिष्य असावा विश्वासी । शिष्य असावा कायाक्लेशी । शिष्य असावा परमार्थासी । वाढवूं जाणे ॥३७ ॥ शिष्य असावा स्वतंत्र । शिष्य असावा जगन्मित्र । शिष्य असावा सत्पात्र । सर्व गुणें ॥ ३८ ॥ शिष्य असावा सद्विद्येचा । शिष्य असावा सद्भावाचा । शिष्य असावा अंतरींचा । परम शुद्ध ॥३९॥ शिष्य नसावा अविवेकी । शिष्य नसावा गर्भसुखी । शिष्य असावा संसार॰

दु:खी । संतप्तदेही ॥४०॥ जो संसारदुःखें दुखावला । जो त्रिविध तापें पोळला । तोचि अधिकारी झाला । परमार्थासी ॥४१॥ बहु दुःख भोगिलें जेणें । तयासीच परमार्थ बाणे । संसारदुःखाचेनि गुणें । वैराग्य उपजे ॥४२॥ जयास संसाराचा त्रास । तयासीच उपजे विश्वास । विश्वासबळें दृढ कास । धरिली सद्गुरूची ॥४३॥ अविश्वासें कांस सोडिली । ऐसीं बहुतेकें भवीं बुडालीं । नाना जळचरीं तोडिलीं । मध्येंचि सुखदुःखें ॥ ४४ ॥ याकारणें दृढ विश्वास । तोचि जाणावा सच्छिष्य । मोक्षाधिकारी विशेष । अग्रगण्य ॥ ४५ ॥

—दासबोध.

---

## २७ कुशिष्य.

एकनाथः— ओंव्या.

गुरुवाक्याचा उल्हासु । ज्या नाहीं तो केवळ पशु । शिष्यामाजी तो रासभवेषु । ज्यासी आळसु गुरुवाक्यीं ॥ १ ॥ गुरुवचन पितृवचन । न करी तो पापी पूर्ण । मनुष्यवेषें तो श्वान । काळें वदन तयाचें ॥ २ ॥ गुरुवाक्य विषम वितंड । न करी म्हणे ज्याचें तोंड । तें तोंड नव्हे रौरवकुंड । पापी प्रचंड तो एक ॥ ३ ॥ जैसें तैसें मनोगत । गुरूसी सांगावें इत्थंभूत । ऐसा विश्वासू नाहीं जेथ । नरकपात त्या नरा ॥ ४ ॥ गुरुसी सांगतां मनोरथ । संकल्पविकल्प मनीं मुक्त । ऐसा विश्वासू नाहीं जेथ । नरकपात त्या नरा ॥ ५ ॥

—भावार्थरामायण.

महीपतिः— ओंव्या.

अविश्वासु आणि कृपण । पाहे लोकांचे दोष गुण ।
परद्रव्याभिलाषी पूर्ण । ऐसा शिष्य करूं नये ॥ ६ ॥

—भक्तविजय.

रामदासः— ओंव्या.

शरण सद्गुरूसी गेले । ते सच्छिष्य ऐसे निवडिले । क्रियापालटें झाले । पावन ईश्वरीं ॥७॥ ऐसा सद्भाव अंतरीं । तेचि मुक्तीचे वांटेकरी । येर मायिक वेषधारी ।

असच्छिष्य ॥८॥ वाटे विषयांचें सुख। परमार्थ संपादणें लौकिक। देखोंदेखीं पढतमूर्ख। शरण गेले ॥९॥ झाली विषयीं वृत्ति अनावर। दृढ धरिला संसार। परमार्थचर्चेचा विचार। मालिन झाला ॥१०॥ मोड घेतला परमार्थाचा। हव्यास धरिला प्रपंचाचा। भारवाही कुटुंबाचा। काबाडी झाला ॥११॥ मानिला प्रपंचीं आनंद। केला परमार्थीं विनोद। आंत मूढ मतिमंद। लाधला कामीं ॥१२॥ सूकर पूजिले विलेपनें। म्हैसा मर्दिला चंदनें। तैसा विषयीं ब्रह्मज्ञानें। विवेकें बोधिला ॥१३॥ रासभ उकरडां लोळे। तयास परिमळ सोहळे। उलूक अंधारीं पळे। तया केवीं हंसपंगती ॥१४॥ तैसा विषयदरींचा वऱ्हाडी। घाली अधःपतनीं उडी। तयास भगवन्तीं आवडी। सत्संग कैंचा ? ॥१५॥ वर्ती करून दांताळी। श्वानपुत्र हाडें चघळी। तैसा विषयीं तळमळी। विषयसुखाकारणें ॥१६॥ तया श्वानमुखीं परमान्न। मर्कटासि सिंहासन। तैसे विषयसक्तास ज्ञान। जिरेल कैचें ? ॥१७॥ रासभें राखतां जन्म गेला। तो पंडितांमध्यें प्रतिष्ठला। न वचे तैसें अभक्ताला। परमार्थ नाहीं ॥१८॥ मिळाला राजहंसांचा मेळा। तेथें आला डोंबकावळा। लक्षूनियां विष्टेचा गोळा। हंस म्हणवी ॥१९॥ तैसे सज्जनाचे संगतीं। विषयी सज्जन म्हणविती। विषय अभेद चित्तीं। गोळा लक्षिला ॥२०॥ कांखे घेऊनियां दारा। म्हणे मज संन्यासी करा। तैसा विषयी सैरावैरा। ज्ञान बडबडी ॥ २१ ॥ असो ऐसे पढतमूर्ख। ते काय जाणती अद्वैत सुख ?। नरकी प्राणी नरक। भोगिती स्वइच्छें ॥२२॥ वेश्येची करील सेवा। तो कैसा मंत्री म्हणावा। तैसा विषयी दास मानावा। भक्तराज केवीं ? ॥२३॥ तैसे विषयी बापुडे। तयांस ज्ञान कोणीकडे ?। वाचाळ, शाब्दिक, बडबडे,। वरपडे जाहले ॥ २४ ॥ ऐसे शिष्य परम नष्ट। कनिष्ठांमध्यें कनिष्ठ। हीन, अविवेकी, दुष्ट। खळ, खोटे, दुर्जन ॥ २५ ॥

—दासबोध.

---

## २८ षड्रिपू.

वामनः—

### श्लोक.

तृष्णेतें निवटीं, क्षमेस जवटीं, गर्वादिकांतें पिटीं।
सत्यातें उमटीं हृदंबुजपुटीं, सेवीं दया गोमटी, ॥

विद्वत्स्नेह तुटी नको करुं, भले त्यांच्या गुणांतें लुटीं, ।
वंशीं कीर्तिवटी उभारिं अरिषड्वर्गासि तूं आपटीं ॥ १ ॥
कांताकटाक्षशर हे रुतती न ज्याला, ।
तावी न कोपज हुताशनही जयाला, ॥
ज्याच्या मनीं न जडती विषयादि पाश, ।
तो धीर चिंतित जगत्रय सावकाश ॥ २ ॥

—शतकत्रय.

श्रीधरः—

### ओंव्या.

काम, क्रोध, मद, मत्सर, । साधक त्यांसी रक्षिती दूर ।
विवेकबळें त्यांचा संहार । करूनि विजयी मग होती. ॥ ३ ॥

—हरिविजय.

अनेक गुणांच्या राशी । एक मोह विभांडी क्षणार्धेंसीं ।
कीं क्रोध संचरतां मानसीं । तयांचिया कोटी विनाशती. ॥ ४ ॥

—जै. अश्वमेध.

महिपतिः—

### ओंव्या.

उदंड तपस्वी असेल आथिला । आणि कामक्रोधा वरपडा झाला । तरी तो निज सुकृतासी मुकला । यथार्थ बोला मानिजे ॥ ५ ॥ अथवा ऋद्धिसिद्धींची लोलंगता । तयासी लागली जरी अवचिता । तरी अंतरला परमार्थस्वार्था । झाला गुंता तयासी ॥ ६ ॥

—भक्तविजय.

श्रीधरः—

### ओंव्या.

आडमार्गें गाई धांवती । नाना कडेकपाटीं रिघती । तृष्णेच्या खळ्यामाजी पडती । कदा न सरती माघारा ॥ ७ ॥ वासनेच्या जाळ्या थोर । त्यांत तोंडें घालती वारंवार । तेथें कामक्रोधादि किरडें अपार । कडकडोनी डंखिती ॥ ८ ॥ द्वेष गर्व मद मत्सर । हेच सावजें भयंकर । विकल्पगुल्में अति घोर । निर्गम

नोहेच तेथोनी ॥ ९ ॥ निंदेचे बोरवडती कांटे । नाना कुतर्क आडफांटे । त्रिविध तापाचे चपेटे । भयंकर वणवा हा ॥ १० ॥

—पांडवप्रताप.

मोरोपंतः— गीति.

चायांचि गर्व धरिती किति, 'आपण जिंकिल्या दिशा' म्हणती; ।
न जिणुनि देहींचे, जे लाविति कामादि चोर सा खणती. ॥ ११ ॥
कामें, कोपें, लोभें, नागविले अमित, यांस जे भुलले; ।
यांच्या कुदृष्टिपातें तेजस्वी पुरुषहीरही उलले. ॥ १२ ॥
कामी, क्रोधी, लोभी, प्राणी तो सेवुनीच विषय मरे; ।
यांसम नसतीच, जरी गमती हे उग्र दहन, विष, यम, रे! ॥ १३ ॥
बा! कोप, लोभ, शठता, असदाग्रह, पिशुनता, कुटिलभाव ।
उद्वेग, दंभ, यत्नें सोडीं, जोडीं महाजनीं ठाव. ॥ १४ ॥
व्याघ्रवृकहरिव्याळप्रभृतींचा जो समूह हानिकर, ।
त्यांहून कामकोपप्रमुखांचा निपट दुष्ट हा निकर. ॥ १५ ॥
कामाची, क्रोधाची, ज्यांहीं केली जपोनि आज्ञा, ते ।
चुकले, स्वहिता मुकले, त्यांतें पाहोनि म्हणति 'हा' ज्ञाते. ॥१६॥
कामा, क्रोधा, लोभा, अनुसरतां लोक फार बा! ठकले, ।
न करावा सद्वेष, स्वहिता देऊं नयाचे पाठ कले. ॥ १७ ॥
ढाळितिल, जाळितिल हिमहेममया कामकोपलोभ नगा, ।
बा! तनया! वात न या पापांचा या पथांत शोभन, गा! ॥ १८ ॥
म्हणवूनि अनुसरावें सुज्ञें न क्रोधलोभकाममता, ।
पतनार्थ कां अहंता पोसावी? गा! तशीच कां ममता? ॥ १९ ॥
ज्या शाणघर्षणादिक संस्कार, चढे गुणासि तोचि मणी; ।
यश संगरेंचि पावे, पंजरबद्धाहि काय हो! चिमणी? ॥ २० ॥

कामक्रोध तपाचे नाशक, या भिउनि अंतरायांतें ॥
जे सावधान वर्तात, धन्यपण तयांचि संतरायांतें. ॥ २१ ॥
हें ब्रह्मकर्म दुष्कर, संरक्षण तों सुदुष्करचि आहे; ॥
कीं यांत च्छळ पुष्कळ, जो सावध, तोचि शुद्ध यश लाहे. ॥ २२ ॥

—स्फुट.

---

## २९ कामादिकांचा सदुपयोग.

मोरोपंतः— गीति.

काम त्यागावा, जरि न त्यजवे सर्वथा तदीय जया ।
तरि तोचि मुमुक्षेप्रति करिजे, कीं तीच होय ओखद या ॥ १ ॥
सक्रोध हो अरिजनीं, स्वकलत्रीं हो सकाम तूं बापा! ।
सक्रोप, सलोभहि चित्तीं हो स्वजनांच्या हराया तापा. ॥ २ ॥
हो द्वेषी पाखंडीं, साधुजनीं हो सराग तूं बा! गा! ।
दुर्मंत्रीं कवळ जड, पिशुनोक्तीं बधिर हो महाभागा. ॥ ३ ॥
जी सत्कथा, सदागम, सुवृत्त, सद्धर्म, जें सदाचरण ।
बा! यांची तृष्णा धर, भावें स्मर शंभुचे सदा चरण ॥ ४ ॥

—ब्रह्मोत्तरखंड.

शुभानंदः— ओंव्या.

यासी प्रपंचीं करूनि विमुख । परमार्थी ठेवावें करूनि नेमक । कामासी परमात्मभजनीं सुख । भक्तिकामीं लाविजे ॥ ५ ॥ क्रोधासी लाविजे उद्योग । विषयपशूतें वोळावें चांग । नासिकीं वेसण दमोनि चांग । मन अधीन करावें ॥ ६ ॥ तीर्थप्रसाद हरिकथाश्रवण । दान भूतकृपा संतपूजन । लोभासी घालावें नमोन । मग सावधान बैसावें ॥ ७ ॥ मोहो असावा सज्जनीं । देवब्राह्मणअतिथिपूजनीं । स्नानसंध्यादि निष्ठाभजनीं । मोहो तेथ लाविजे ॥ ८ ॥ मदें दंडावे

दुर्गुण । मदें मर्दावें दुर्व्यसन । भक्तिमदें उन्मत्त होऊन । परमानंदें निर्लज्ज नाचावें ॥ ९ ॥ मत्सरासि नाशिवंत खुण । दावोनि करावा विचक्षण । संसार-मत्सर करोन । व्हावें समाधान परमार्थी ॥ १० ॥ करितां षड्रिपु उफराटे । तेचि नेति मुक्तिवाटे । तेचि प्रपंचीं महाखोटे । महानरकीं लोटिती ॥ ११ ॥ जैसा नळिकेवरील शुक । नळिकेसवें भोगी दुःख । तेचि नळिका निष्टंक । सोडितां होय सुखरूप ॥ १२ ॥ लोभें न सोडी मुष्टीसी । मुष्टी बांधोनि पडे फासीं । तेचि मुष्टी सोडितां त्यासी । वानरासी भय कैंचें ॥ १३ ॥ नातरी आदर्शाचे सदनीं । प्रतिरूपसंभवा पाहोनि श्वानीं । भुंकभुंकोनियां वदनीं । प्राणांतव्यथा पावलें ॥ १४ ॥

—उद्योगपर्व.

---

## ३० द्रव्यलोभ.

**एकनाथः—** **ओंव्या.**

तेवीं अल्पही लोभाची जे वस्ती । नाशी गुणौदार्ययशकीर्ती । लोभा ऐसा त्रिजगतीं । कर्ता अपकीर्ति आन नाहीं ॥ १ ॥ धनलोभीं सदा विरोधू । धनलोभ तोडी सखे बंधू । धनलोभा ऐसा नाहीं बाधू । अशुद्ध आणिक असेना ॥ २ ॥ प्रथम शिणावें द्रव्य जोडितां । दुसरें शिणावें तें वाढवितां । द्रव्य जरी झालें उत्कर्षता । तरी लोभ सर्वथा पुरे न म्हणे ॥ ३ ॥

—भागवत.

द्रव्यलोभ देखे ज्यापाशीं । सदा ओळखे तयासी । अणुमात्र नुल्लंघी वचनासी । म्हणे सर्वस्वें मी दास तुझा ॥ ४ ॥ देख धनवंत वेव्हारें । सौजन्य त्यासी अत्यादरें । विरक्त देखोनि एकसरें । स्वयें दातारें बैसवी ॥ ५ ॥ म्हणे भगवंताची कोण सत्ता । सिद्ध ईश्वरदत्त भोग असतां । सांडूनि धरिली तापसता । अभाग्यता केवढी पां ॥ ६ ॥ धनलोभीं जे लुब्धक । स्वप्नीं न देखती सुख । या जन्मा-दारभ्य देख । भोगिती नरक अनिवार ॥ ७ ॥ मरणांत झटे घेतां । रुका न

मिळे सर्वथा । तथापि सायास करितां । आळस चित्ता उपजेना ॥ ८ ॥ ऐसें ऐशा कष्टें मिळे । तें वाढवी उपायबळें । निजशरीर कष्टविलें । जेणें फळे निज मोक्ष ॥ ९ ॥ जेणें भोगिजे इहभोगु । जेणें भोगिजे स्वर्गभोगु । जेणें साधिजे मायायोगु । जिवशिवविभागु जेथें नाहीं ॥ १० ॥ एवढिये प्राप्तीचे दाते । ते कष्टती धनार्जनातें । इतरासी कोण पुसे तेथें । दुःखें समस्तें संगतींचीं ॥ ११ ॥ देवधर्म नेणती कांहीं । पर्वकाळ ठाउका नाहीं । श्राद्धाची संभावना नाहीं । निराश पाहीं सदा पितर ॥ १२ ॥ जैं धनाचा वेंच होय । तैं प्राणचि जाऊं पाहे । सणावाराची नेणे सोय । अतिथी तेथें काय करील ॥१३॥ कष्टें जोडिली संपत्ति । ते ठेविती अति निगुति । तोंडीं दगडमाती घालिती । आपण मरती धुळी खात ॥१४॥ लोभें ऐहिकीं न मानी कोणी । लोभें निंद्य होइजे जनीं । लोभें परलोकाची हानी । निंद्य पतनीं पडे लोभें ॥१५॥ वंचोनि उत्तम लोकासी । लोभें होइजे नरकवासी । म्हणोनि निर्लोभ मानसीं । द्विजसेवेसी करावें ॥ १६ ॥ ज्याचा जेथें अतिशयो पूर्ण । तें त्यासी न पावतां जाण । स्वयें होउनी दुःखनिमग्न । बोले पैशून्य सर्वदा ॥ १७ ॥ जेथें दृढत्वें लोभाची वस्ती । तेथें कैंची विवेकस्थिति । अंध होउनि ठाके वृत्ति । दृढ विषयार्थी लोभिष्ट ॥ १८ ॥ लोभ तेथें कैंचें ज्ञान । लोभ तेथें कैंचें ध्यान । लोभ तेथें समाधान । सर्वथा जाण पैं नाहीं ॥ १९ ॥ लोभ तेथें कैंची भक्ति । लोभ तेथें कैंची मुक्ति । जेथें लोभ तेथें विरक्ति । नाहीं निश्चितीं सर्वथा ॥ २० ॥ लोभाचें ठाणें अंतरीं असतां । सकळें साधनें होती वृथा । गुरूसी चाळी विकल्पता । ज्याचेनि तत्वतां मोक्ष लाभे ॥२१ ॥ माता पिता इतर जन । त्यांची कथा गणी कोण । हें लोभाचें स्वाभाविक चिन्ह । कुबेर जाण तैसा नव्हे ॥ २२ ॥ राज्यलोभाची जाती पाहीं । धर्माधर्म नाठवे कांहीं । ज्येष्ठाचा तेथें पाड काई । अंध लवलाहीं बुद्धि होय ॥ २३ ॥ राज्यभोग देखतां पुढें । मन होवोनि ठाके वेडें । साखरेवरोनि माशी बुडे । तेवीं जडे विषयार्थी ॥ २४ ॥

—मा. रामायण.

महीपतिः— ओव्या.

आलियासि बसा न म्हणे। तो काय घालील मिष्टान्न भोजनें । कीं प्रयोगा नायकेचि करितां स्नानें । तो दक्षिणादान करील काय ॥ २५ ॥ जो तुळसीसी न घाली जीवना । तो घालील काय प्रदक्षिणा । सज्जन देखोनि न करी नमना । तो सदना घेउनि न जाय ॥ २६ ॥ जो वाट सांगेना पांथिकासी । तो मंदिरीं कैसा ठाव देईल त्यासी । जो स्वमुखें निंदी देवभक्तासी । तो हरिकीर्तनीं न जाय ॥२७॥

—भक्तविजय.

मोरोपंतः— गीति.

वित्तप्रयोजनाधिक जें तें संरक्षणें असुख रचितें ।
किंबहुना जो लोभी जन त्याचें सर्वथा असु खरचितें ॥ २८ ॥
'दारिद्र्य कोण? सांगा, बहु पुसतो कीं तुम्हां नसे रोष' ।
'शिष्या! बरवें पुशिलें; दरिद्रपण तेंचि जो असंतोष' ॥ २९ ॥
संतुष्ट पुरुष सहजें लाभेंचि सुखेंकरुनि वर्ततसे ।
होतात असंतुष्टा प्राप्त सकळ लोक, असुखगर्त तसे ॥ ३० ॥
भवहेतु असंतोषचि, संतोषचि मुक्तिकारणें होतो ।
हाचि अमृतरस, दुसरा यापरि फेडी न पारणें हो! तो ॥ ३१ ॥
जो संतुष्ट यदृच्छालाभें ब्राह्मण सदैवही असतो, ।
वाढे तत्तेज, असा बहु तेजःकर, नव्हे सुधारस तो ॥ ३२ ॥
द्विजतेज असंतोषें शमतेंचि, ज्वलन जेविं तोयांत, ।
हालाहलांत दुर्गुण जो जैसा काय, तेवि तो यांत ॥ ३३ ॥

श्लोक.

सत्ता दत्तावरि करि असा कोण योगींद्र आहे?
मत्ता लत्ताप्रद अहिवरा कोण कल्याण वाहे? ।
लोभा शोभासुमतिहरित्या सुज्ञ चित्तीं न वाहे,
हो भा क्षोभास्तव नच उणी, भाग्य पापें न राहे ॥ ३४ ॥

आत्मप्राप्तिसुख प्रसिद्ध परमश्रेष्ठ श्रुतींच्या मतें,
जेथें त्यागुनि अन्य, चित्त कविचें सुश्रांत विश्रामतें ।
तें द्रव्यें न मिळेचि, दास्यचि तुझें त्याचें खरें साधन,
सेवेनेंचि सुखी असे, हरि! नको या पाददासा धन ॥ ३५ ॥

—स्फुट.

एकनाथः— **ओंव्या.**

विषयांचिये विषय पुष्टी । रमा गोड प्रथम दृष्टी । लक्ष्मी विन्मुख झालिया पाठीं । दुःख कोटी श्रीमंता ॥ ३६ ॥ लक्ष्मी आलिया जें सुख । सुख नव्हे तें केवळ दुःख । सुख मानिता ते केवळ मूर्ख । जाण निष्टंक नृपनाथा ॥ ३७ ॥

—भावार्थरामायण.

लक्ष्मी विश्वगुरु हरीची पत्नी । तीतें जो तो राखे अभिलाषूनी । नेदिती हरीची हरीलागोनी । त्यातें पतनीं हरि पचवी ॥ ३८ ॥ प्रथम दुःख द्रव्य संचितां । दुसरें दुःख द्रव्य रक्षितां । स्त्री पुत्र प्रवर्ते घाता । इतर कथा ते भिन्न ॥३९॥ द्रव्य नाहीं ज्यांच्या हातीं । त्यातें देखोनि चोर भीती । कांहीं मागेल आम्हांप्रती । म्हणोनि लपती त्या भेणें ॥ ४० ॥

—भागवत.

महीपतिः— **ओंव्या.**

जवळी द्रव्य असतां पाहे । एकव्यानें निद्रा करूं नये । द्रव्यासी महाभय । सावध असावें सर्वदा ॥ ४१ ॥ द्रव्य आशा धरिली जरी । सखे बंधु होती वैरी । द्रव्य तारी द्रव्य मारी । दोन्ही परी असती कीं. ॥ ४२ ॥

—भक्तविजय.

वामनः— **श्लोक.**

द्रव्यास हे गमनमार्ग यथावकाश,
कीं दान, भोग, अथवा तिसरा विनाश. ।

जो घे न भोग, जरि पात्रकरीं न देई
त्याच्या धनास मग केवळ नाश पाहीं ॥ ४३ ॥

— स्फुट.

एकनाथः— ओंव्या.

ऐक दरिद्राचें लक्षण, । गाठीं असतां कोटी धन, । ज्याचें संतुष्ट नाहीं मन । परम दरिद्री जाण या नांव. ॥ ४४ ॥ ज्याचे गांठीं नाहीं कांचवटी, । परी संतुष्ट नित्य आहे पोटीं, । तोचि संपन्न सकळ सृष्टीं । सत्य गोष्टी हे उद्धवा ॥ ४५॥

—भागवत.

## ३१ स्थिरलक्ष्मी.

श्रीधरः— ओंव्या.

जेथें शौचाचार सत्यवचन । जेथें सदा करिती शुभचिंतन । स्त्री करी जेथें पति-सेवन । त्या घरीं लक्ष्मी स्थिरावे ॥ १ ॥ पुत्र सेविती मातापितरां । कनिष्ठ सेविती ज्येष्ठ सहोदरां । जेथें काम वश्य न करी ज्यां नरा । त्या घरीं लक्ष्मी स्थिरावे ॥ २ ॥ जेथें नसे लटकी साक्षी । जेथें भोजन न घडे असाक्षी । जेथें कृतघ्नता नसे साधुपक्षीं । त्या घरीं लक्ष्मी स्थिरावे ॥ ३ ॥ जेथें भक्तिमुक्ति होय कर्म । जेथें वचन बोलती अमृतोपम । शूरत्व करोनि न बोलती पराक्रम । त्या घरीं लक्ष्मी स्थिरावे ॥ ४ ॥ जेथें वित्त असतां नव्हे शठपण । जेथें स्वल्पही नसे भ्रांतिवचन । जेथें श्राद्धक्रिया होती जाण । त्या घरीं लक्ष्मी स्थिरावे ॥ ५ ॥ स्वयें प्राप्त झालिया पररमणी । तीतें मानी जो स्वजननी । वापी कूपादिककारक जनीं । त्या घरीं लक्ष्मी स्थिरावे ॥ ६ ॥ देवालयें विप्रमंदिरें । करिती आराम आणि सरोवरें । जेथें तीर्थयात्रा आदरें । त्या घरीं लक्ष्मी स्थिरावे ॥ ७ ॥ जेथें नसे पैशून्य आणि निंदा । जेथें असे व्रततपदान सदा । जेथें कलह नसे कदा । त्या घरीं लक्ष्मी स्थिरावे ॥ ८ ॥ दुष्ट आणि दुर्जन । वृषळीपति आणि पैशून्य । त्यातें लक्ष्मी आणि नारायण । कदाकाळीं शिवेना ॥९॥ जो लवणादि

रसविक्रय करी । जो वस्त्रहेमाचि चोरी करी । जो संपूर्ण द्यूतक्रिया करी । लक्ष्मी त्या घरीं न राहे ॥ १० ॥

—जै० अश्वमेध.

---

## ३२ विषयलोभ-तृष्णा-आशावश्यतपणा.

मोरोपंतः— गीति.

मन हें घातक वेडें विषय व्याळासवें करी क्रीडा, ।
पीडाचि पावतें, परि सावध नोहे, न तें धरी व्रीडा. ॥ १ ॥
जें पृथ्वीवरि धान्य, स्वर्ण, मणि, पशु, स्त्रिया, असे कांहीं, ।
तें सर्वहि एकाच्या तृप्तिस पर्याप्त सर्वथा नाहीं. ॥ २ ॥
वामन म्हणे, 'प्रिय विषय जितुके या त्रिभुवनांत आहेत, ।
तेही अजिता! याचा पूर्ण कराया न शकति बा! हेत. ॥ ३ ॥
जो त्रिपदमहीलाभें संतुष्ट त्रिभुवनेश्वरा! नाहीं, ।
होइल न सनववर्षद्वीपेंही पूर्णकाम तो कांहीं ॥ ४ ॥
सप्तद्वीपवरांच्या इच्छेनें सर्वदा तळमळेल, ।
तृष्णानळें न पावुनि सुविवेका, चित्तिचें जळ मळेल. ॥ ५ ॥
सप्तद्वीपवरेश्वर ऐकतसों पृथुगयादिही बा! जे, ।
अर्थांहीं, कामांहीं, तृष्णान्ता ते न पावले राजे. ॥ ६ ॥
बहु विषयसवन जसें, स्रोत तसें मानवा न वाहवितें; ।
न शमे स्मर विषयातें पावोनि, शिखी नवा नवा हवितें. ॥ ७ ॥
कविस रुचे घालावें विषयसुख, करोनि घोर तप, डावें; ।
मूढासि आवडे बहु जेउनि सस्त्रीक घोरत पडावें. ॥ ८ ॥
जी दुस्त्यजा कुमतिही, जीर्णाचीही न जी जिरे लेश, ।
जो प्राणान्तिक गद ती तृष्णा त्यजि, त्यासी सर्व सुख देश.॥ ९ ॥

जीर्णाचे केश जिरति, जीर्णाचे जिरति सर्वही दन्त ।
परि जीर्णाच्या ज़ीवित धनवांच्छा ज्या, तयां नसे अन्त. ॥ १० ॥
कामसुख असे लोकीं, दिव्य महत्सुखहि जें असे भोग्य, ।
तृष्णानाशसुखाच्या सोळाव्याहि न कळसि तें योग्य. ॥ ११ ॥

—स्फुट.

वामन :—

### श्लोक.

आशा थोर नदी, मनोरथ तिचें पानीय, वीची तृषा, ।
स्त्रीपुत्राद्यनुराग हीं जलचरें, जे पूर्ण कूलंकषा, ॥ १२ ॥
संसारभ्रम भोंवरा गरगरी, चिंताच जीचीं तटें, ।
तीतें जे तरले मुनीश, न कधीं ते पावती संकटें. ॥ १३ ॥
न भोगिले भोगहि मीच भोगिलों, न साधिलेही तप मीच तापलों ।
न काल गेला, तरि मीच चाललों, न खुंटली आसहि मीच खुंटलों ॥ १४ ॥

—वैराग्यशतक.

मोरोपंत

### गीति.

'तस्कर कोण स्वामी?' 'वत्सा! जे विषय, दस्यु ते जाण'।
'कोण भवाची वल्ली?' 'शिष्या! तृष्णाचि रे तुझी आण' ॥ १५ ॥
'मद्यापरि मोहप्रद काय? स्वामी! दया करूनि वदा!'।
'शिष्या! पुत्र कलत्रीं सुरहुनि स्नेह दे अपार मदा' ॥ १६ ॥
'ज्याचें अनर्थ फळ, तें काय? श्रीगुरुवरें निवेदावें'।
'शिष्या! विषयांपासुनि न निवारित चित्त तें असो ठावें' ॥ १७ ॥

—प्रश्नोत्तरमाला.

### श्लोक.

अनावर पिशाचिका विषयवासना सत्य, जी ।
असें करवि कृत्य जी, भुलविते, कधीं न त्यजी ॥

म्हणोनि तुज जाणत्या विनवितों, ' इला काढ गा! ' ।
करीन मग तूं जरी म्हणसि आपगा गाढ गा ॥ १८ ॥

—केकावली.

वामनः— **श्लोक**

शिणोनि फिरलों महा विषमदुर्ग देशान्तरीं; ।
तथा प्रभुहि सेविले, न फल लाधलें कीं तरी; ॥
सशंक जरि जेविलों परगृहीं जसा कावळा; ।
परंतु न दिसे मला कठिण आस हे दुबळा ॥ १९ ॥

ज्यां साहिली खलजनोक्ति कठोर पाहीं; । पोटांत दुःख वरचेवर हांसलोंही; ॥
कीं प्रार्थिलें स्वजठरार्थ मदांध लोकां; । आशे! अशीच मज नाचविशी किती कां? २०
वदना रदनावलिनें त्यजिलें; । शिर सर्वहि शुभ्रपणें पिकलें; ।
उठतां बसतां अणु शक्ति नसे । परि आस निरन्तर माजतसे ॥ २१ ॥
भिक्षाटणें अशन तें क्षण एकवार; । शय्या महीवरि जयांसि न रांड पोर; ॥
कंथा जया वसन कीं शतखंड तेंही । टाकीच ना तदपि तो विषयास देही ॥ २२ ॥
न जाणतां, टोळ पडे हुताशीं, । नेणोनियां मीन गिळी गळाशीं, ॥
अभिज्ञ आम्ही विषयास जेव्हां । सांडूच ना मोह बलिष्ठ तेव्हां ॥ २३ ॥

हे नानाविध भोग भंगुर वृथा, तन्मूल संसार रे!
कां मूढा! भ्रमसी तदर्थ सहसा, हें सर्व आतां पुरे ॥
आशापाशशतासि टाकिं परतें कामासही, हो भला ।
हा अस्मद्वचनार्थ रे जरि तुला आहे खरा मानला ॥ २४ ॥

—स्फुट.

शुभानंदः— **ओंव्या.**

लोभाल्लोभश्च वर्धते । ऐशी आहे शास्त्ररीति । जितुका जितुका लाभ क्षिति । लोभ वाढ मागुती ॥ २५॥ लाभें लोभासि होय वृद्धि । कोण तरेल तृष्णानदी । जो पावला ब्रह्मानंदीं । नैराश्य तो एक उतरला ॥ २६ ॥ सिंधु नको न म्हणे

जैसा । नदी प्राशितां, पुढती तैसा । काष्टें वोपितां हुताशा । नको न म्हणे तत्वतां ॥ २७ ॥ तयापरी विषयात्मा मानव । विषयभोग भोगितां सर्व । तृप्ती न म्हणे दुर्जीव । पुढें पुढें मग धावे ॥ २८ ॥ मृगें पाहती जळ फार । धांवतां पुढां दिसे नीर । भोगितां विषय पामर नर । पुढां पुढां सुख भोगी ॥ २९ ॥ एवं तृष्णासागर । न पावे कोणी परपार । मायें बुडाले जीव समग्र । जैसे मत्स्य मगर सागरीं ॥३०॥ माया तृष्णा तें वो नीर । मत्स्यरूपें सकळ जीव पामर । हिंडतां नेणती परपार । या अघोर भवसिंधूचा ॥ ३१ ॥ भोगीत असतां विषयच्छंद । वय जावोनि झाला वृद्ध । अंतरीं तेव्हांही कल्पनाछंद । तृष्णावृद्ध पैं नव्हे ॥ ३२ ॥ मान हाले भरभराटी । चरणीं न चले धरी काठी । झुळ झुळ लाळ वाहे ओठीं । परी तृष्णा पोटीं तरुणी ते ॥ ३३ ॥ दंत पडोनि बोचरखेडी । केंस पिकोनि झडली शेंडी । परी अंतरीं न सुटे विषयवोढी तृष्णा गाढी तरुणी ते ॥ ३४ ॥ कर चरण वेगळे काढी । पाठ मोडोनि । झाली घडी । सकळ इंद्रियांची प्रौढी । परी तृष्णा गाढी तरुणी ते ॥३५॥ दृष्टि जावोनि झाला अंध । बाधिरत्व पावला बुद्धिमंद । परी अंतरीं न सुटे विषयच्छंद । तृष्णा पोटीं तरुणी ते ॥ ३६ ॥ आप्त सुहृद मित्रजन । गेले स्वर्गाप्रति सांडोन । परी न इच्छी पैं मरण । पाठीं तृष्णा तरुणा ते ॥ ३७ ॥ विषयलोभिया भक्ति नाहीं । विषयलोभिया सत्य नाहीं । विषयलोभिया देव नाहीं । मित्र नाहीं लोभिया ॥ ३८ ॥ नाहीं विषयलोभिया कुळ । नाहीं विषयलोभिया स्थळ । विषयलोभी आंधळा केवळ । पापपर हेंही नाहीं ॥ ३९ ॥

—उद्योगपर्व.

**महीपतिः—** **ओंव्या.**

आशापाशें नाडले बहुत । आशेकरितां अपमान होत । आशावंत जो कां संत । लोक निंदित त्यालागीं ॥४०॥ आशावंत घराचारी । यजमानाचें आर्जव करी । कुटुंब त्याचें अनुपकारी । अनुताप अंतरीं न होय ॥४१॥ वेद शास्त्रेंही पढिन्नला । विद्वान पडित निपुण झाला । परी तो परमार्थासी मुकला । द्वेष वाढला

आशेनें ॥ ४२ ॥ एक नग्न दिगंबर अवधूत । होऊनी फिरती अरण्यांत । परी आशापाशें नाडिलें त्यांतें । जनासि हात पसरिती ॥ ४३ ॥ एकीं घेतलें संन्यासग्रहण । परी जिव्हेसी नावडे कदन्न । त्याची आशा धरितां जाण । नारायण अंतरला ॥ ४४ ॥ एक करिती तपाचरण । वरते हात धूम्रपान । हात पसरिती जनांकारणें । तेही आशेनें नाडिले ॥ ४५ ॥ ऐशी आशा महा वैरीण । मुमुक्षु साधक ठकविले येण । श्रीहरिकृपा करील जाण । तरीच मन स्वस्थ राहे ॥४६॥ सेवितां प्राण्यास वाटतें सुख । परी परिणामीं होय दुःख । विषय सेवितां थकले लोक । अतीं नरक प्राप्त तयांसी ॥४७॥ शब्दविषय मृगांकारणें । परम आवडे जी वाहून । नादीं लुब्ध होतांचि जाण । पारधी विंधोनि मारिती ॥ ४८ ॥ स्पर्शविषय तो स्त्रीसंग । तेणेंचि नाडिले अवघे मातंग । रूप विषयीं लाधला पतंग । जळलें अंग तयाचें ॥ ४९ ॥ रसविषय मत्स्याकारणें । आमिष गिळितां सुखावे मन । गळ आसुडितां हिंसकानें । अचुक मरण चुकेना ॥ ५० ॥ गंधविषय भ्रमर सेविती । कमळमकरंदीं लुब्ध होती । अस्तमानासी जातां गभस्ती । गुंतती त्यामाजी ॥ ५१ ॥ एक एक आवड एकाचे ठायीं । त्यांची गती ऐशीच पाहीं । आणि पंचविषय नरदेहीं । परिणाम नाहीं उत्तम ॥ ५२ ॥ परी रसनाविषय अवघ्यांत दुष्ट । याचेनि इंद्रियें होतात पुष्ट । यालागिं जे कां सज्ञान श्रेष्ठ । रसना स्पष्ट जिंकावी ॥ ५३ ॥ वासनाक्षय नव्हेचि ज्यासी । गोड अन्न पाहिजे खावयासी । यास्तव जाहले संन्यासी । वृथा गुरूसी नाडिलें ॥ ५४ ॥ मरणसमयीं इंद्रियें क्षीण । तिळमात्र न खाववे अन्न । परी वासना म्हणे मी पदार्थ सेवीन । तरी जन्म घेणें चुकेचिना ॥ ५५ ॥ सहज समयीं मिळेल जैसें । क्षुधाहरणार्थ सेविजे तैसें । तरीच निर्विघ्न मुमुक्षूस । वासनानाश सहजचि ॥ ५६ ॥

—संतविजय.

---

## ११ ताठा-अभिमान-अहंकार.

श्रीधरः— ओंव्या.

येतां योग्यता अभिमान । सत्संग नावडे मनांतून ।
चित्त उठे कुतर्क घेऊन । तरी हरिचरण अंतरले ॥ १ ॥

—हरिविजय.

जेथें गर्व अभिमान । तेथें सर्वदा भ्रमण । न चुके त्याचें जन्ममरण । केलिया जाण निजमुक्ति ॥ २ ॥ अल्पविद्या अल्पधन । यासी असे दुरभिमान । ऐसा जो सर्वगुणीं संपन्न । त्यासी अभिमान पै नाहीं ॥ ३ ॥ अल्पोदक कुंभ भरीत । उचंबळोनि होय रिक्त । सर्वगुण जो भरित । तो निःशब्द निरभिमानी ॥ ४ ॥ मी शिवभक्त म्हणतां रावण । गर्वें गेला त्याचा प्राण । गर्व धरितां दुर्योधन । सहपरिवारें निमाला ॥ ५ ॥ मी थोर दुजा सान । हा न धरावा अभिमान । सर्वथा न करावें पापाचरण । काळ नसे एकरूप ॥ ६ ॥ पिपीलिका अत्यंत सान । हर्ष पावोनियां जाण । महास्थूळ कुंजराकारण । कर्णी जातांचि मारिती ॥ ७ ॥ मी थोर हा धरूनि अभिमान । बळें दीनाचें करितां छळण । न चाले त्याचा अभिमान । दीनरक्षक परमात्मा ॥ ८ ॥ दीन हीन साहे अपमान । परी त्याचे मनीं दीर्घ अभिमान । चरणें ताडितां रजःकण । मस्तकीं त्याचेच बैसती ॥ ९ ॥ मुळींच उठतां अभिमान । अभिमानें होय बंधन । मग विघ्नें येऊन । तयावरी कोसळती ॥ १० ॥ म्हणोनि लहान थोरें अभिमान । सर्वथा न करावा जाण । सर्वांतर्यामी भगवान । भरोनियां राहिला ॥ ११ ॥ ज्याची वृत्ति निरभिमान । तो सर्वांचें दुःख करी हरण । जो अहंकारी पूर्ण । त्यासी नारायण दुरावे ॥ १२ ॥

—जै. अश्वमेध.

एकनाथः— ओंव्या.

अभिमानाची जाती कैशी । अधिक खवळे सज्ञानापाशीं ।
जो दाखवी गुण दोषांसी । निंदा स्तवनासी उपजवी ॥ १३ ॥

—भागवत.

अहंकार जडला जीवीं । तो साधूनि रिघोनि गोवीं । अहंकार जीवभावीं । उघड नागवी जगातें ॥ १४ ॥ मुख्य घातक अहंता । तीसी साह्य झाली ममता । अहंममता न जाणतां । सुख सर्वथा असेना ॥ १५ ॥ अहमात्मा जें मीपण । तें मुख्य भ्रमाचें निजकारण । तूं म्हणणें हा भ्रम दारुण । मीतूंपण भ्रममूळ ॥ १६ ॥ अहंता कर्मसिद्धि न वचे । अहंता सुख न घडे स्वर्गीचें । अहंता सार न पावे वेदाचें । अहंता साच घातक ॥ १७ ॥ अहंता न साधे स्वामिकार्य । अहंतेनें साधन हत होय । अहंता यश न लाहे । निंद्य होय अहंता ॥ १८ ॥ अहंता नव्हे चित्तशुद्धि । अहंता नव्हे साधन सिद्धि । अहंता नव्हे चित्तशुद्धि । अहंता त्रिशुद्धिघातक ॥ १९ ॥ ऐहिक सुख नव्हे देख । अथवा नव्हे पारत्रिक । अहंता भोगिजे नरक । अहंता घातक जगा झाली ॥ २० ॥ अभिमानाची जाती पाहीं । साधुसंता न मानी कांहीं । ज्ञानगर्वें बुडाले तेही । शुद्धि नाही तपांची ॥ २१ ॥ धांवणें नागवी आपण । तरी कोण करील सोडवण । अभिमानें यापरी जाण । सकळ जन नागविले ॥ २२ ॥ ज्ञानगर्वें नागविले । ते काळातें देखती वहिले । सिद्ध आयुष्य वायां गेलें । तें जोडितां न मिळे पुण्यकोटी ॥ २३ ॥ गर्वाचा ताठा चढला । तेणें विवेक बुडविला । त्रिमदें अति मातला । घात केला स्वयेंचि ॥ २४ ॥ धनमद पानमद । अतिमान्य-तेचा राजमद । तेणें प्राणी होय अंध । कार्यानुवाद नाठवे ॥ २५ ॥

—भावार्थरामायण.

मोरोपंतः— **गीति.**

बहु पुरुषजन्म दुर्लभ, तेथें अत्यन्त सर्व हानिकर ।
पापांचा, शापांचा, तापांचा होय गर्व हा निकर ॥ २६ ॥
अर्थीही मद होतो, होय पुरुष बहु अनम्र बा! धात्या ।
अवमानितो जनांतें, [हरितेंही,] ती पिशाचबाधा त्या. ॥ २७ ॥
जो ज्ञाता हितकर्ता, म्हणती ' कुलजीं न दर्प राहो ' तो; ।
कीं या सर्वरवहरा भजतां जन पात्र खर्परा होतो. ॥ २८ ॥

श्लोक.

जो भाग्यमत्त, जड तो जन अंधसा, हें । त्यातें म्हणे व्यसन 'दुःसह बंध साहें' । सामर्थ्य पूर्ण असतांहि कधीं नयाचा । न त्यागिती पथ, सुकीर्ति अधीन याच्या ॥ २९ ॥

गीति.

व्यसनीं सरंध्रहि उरे जोंवरि राहे धरूनि तळ उगला. ।
भक्ष्यवि, इतर सुवृत्तहि, वटक कटाहीं तरूनि जो फुगला. ॥ ३० ॥
गर्वे ज्ञानबळाच्या करितां भलतेंचि कर्म ठकवीतें; ।
विप्रा ! दुराग्रहानें घडतो बहु घात कर्मठ कवीतें ॥ ३१ ॥

—स्फुट.

वामनः—

श्लोक.

विकल्पाची राशी धरि मन मिराशी सतत रे, ।
तरेना सत्संगीं बहुवय सगर्वे उतत रे, ॥
हरीभक्तद्वेषी विकल अविनाशी जन नते, ।
न तेजस्वी वंशीं धरिति नरवर्या! जनन ते ॥ ३२ ॥

ओंव्या.

जे आपणास शास्त्रज्ञानी । मानिती स्वमताभिमानी ।
परी ते जें जें जाणतों म्हणती मनीं । त्या त्या ज्ञानीं ते मूढ ॥ ३३ ॥

—स्फुट.

शुभानंदः—

ओंव्या.

मताभिमानी, देहाभिमानी, । भाषाभिमानी, धर्माभिमानी । कुळाभिमानी, ज्ञानाभिमानी, । चौऱ्यायशी लक्ष योनी बांधी तया ॥ ३४ ॥ जे अभिमानातीत झाले, । संतवचनीं विश्वासले, । ते मोक्षनिशाण लावोनि गेले । जन्ममरण त्यां नाहीं ॥ ३५ ॥

—भीष्मपर्व.

एकनाथः— **ओंव्या.**

साधु सर्वांगीं चैतन्यघन । त्यांसीं न भजतां धरी ध्यान । तें ध्यान नव्हे, परम विघ्न । अधःपतन ध्यानगर्वें ॥ ३६ ॥ उपेक्षोनि साधुसज्जन । जो साक्षेपें करी ध्यान । ध्यान नव्हे तें नागवण । आपणाआपण नाडिलें ॥ ३७ ॥ ध्यानगर्व ज्याचे ठायीं । ज्ञानगर्वें जो उताणा पाहीं । विद्यागर्व मुसमुसे देहीं । तो नर पाहीं अधःपाती ॥ ३८ ॥ साधु सच्चिदानंद व्यक्ती । ध्यानाची काल्पनिक मूर्ती ॥ साधु उपेक्षा ध्यानीं प्रीती । ते अधःपाती ज्ञानगर्वें ॥ ३९ ॥

—मा. रामायण.

वामनः— **श्लोक.**

वृक्ष फार लवती फलभारें । लोंबती जलद घेउनि नीरें ।
थोर गर्व न धरी विभवाचा । हा स्वभाव उपकारपराचा ॥ ४० ॥

—नीतिशतक.

विपुल हृदय ज्यांचें, निर्मिलें विश्व तींहीं; ।
निजशिरिंहि परांहीं वाहिले सर्व पाहीं; ॥
तृणसम दिधलें हे विश्व जिंतून एकीं; ।
कितिक असति भाक्त; गर्व कां क्षुद्र लोकीं? ॥ ४१ ॥

स्वर्गापासुनि शर्वमस्तक तटीं तेथूनियां भूधरीं, ।
ग्रावाग्राहुनि भूतळीं उतरली ते स्वर्नदीसत्वरीं; ॥
गेली तेथुनि अर्णवाप्रति; मदें ते वंद्यही कष्टली; ।
जे कां दुर्मद त्या अधःपतनता आहे बरी निर्मिली ॥ ४२ ॥

—वैराग्यशतक.

मोरोपंतः— **गीति.**

हातींचें स्वहित हटें जातें, मग चित्त फार हळहळतें ।
माति वसुमतीविदारक फार कठिण दुःसह व्यसनहळ तें ॥ ४३ ॥

ज्या ऐसें कळलें कीं हितशत्रु कृतघ्नराज हठ कविला, ।
तो एक महा ठक या क्षुद्रें संसृतिपथांत न ठकविला. ॥ ४४ ॥

—स्फुट.

एकनाथः— ओंव्या.

मी ज्ञाता तो अज्ञान । ऐसें जेथें स्फुरे स्फुरण । तेथोनि पळे ब्रह्मज्ञान । ज्ञानाभिमान उरे देहीं ॥ ४५ ॥ हिंग पडतांचि रांजणीं । गोडचणी होय हिंगवणी । तेवीं विकल्प प्रवेशितां ज्ञानीं । ज्ञानाभिमानी उरे ज्ञाता ॥ ४६ ॥ दुग्धीं कांजीचा थेंबू पडे । तेणें दुग्धाचे होती कवडे । तेविं ज्ञानीं विकल्प वाढे । तैं ज्ञान उडे ज्ञानाभिमानें ॥ ४७ ॥ सावध कनकबीज खाय । तो क्षणार्धें भ्रमित होय । तेविं विकल्पाचा अन्वय । ज्ञाता होय अभिमानू ॥ ४८ ॥ दीप मालवल्यापाठीं । काजळीची पोहणी उठी । तेविं ज्ञान जातांचि शेवटीं । अति गर्व उठी ज्ञानाभिमानू ॥ ४९ ॥

—भावार्थरामायण.

---

## ३४ क्रोध.

मुक्तेश्वरः— ओंव्या.

क्रोध आधीवीण आधी । क्रोध तोचि महाव्याधी । क्रोधें सूदिले अप्रमादी । सारासार जाणते ॥ १ ॥ क्रोध तोचि अपस्मार । क्रोध तोचि भूत संचार । क्रोधें कीजे पिशाच नर । परम चतुर विवेकी ॥ २ ॥

—आदिपर्व.

महीपतिः— ओंव्या.

अंतरीं असतां क्रोधखळ । त्या अवघेंचि भासे अमंगळ । दृष्टीं कोणी न दिसे निर्मळ । विकल्पजाळांत पडियेले ॥ ३ ॥

—भक्तिविजय.

एकनाथः— ओंव्या.

क्रोध पित्यापुत्रातें बाधी । क्रोध स्त्रीपुरुषा विरोधी । क्रोध प्रिया प्रिय उच्छेदी । क्रोध त्रिशुद्धीं अनर्थ ॥ ४ ॥ क्रोध निजज्ञाना निर्दाळी । क्रोध स्वार्थाची करी

होळी । क्रोध तापसातें छळी । क्रोध महाबळी अनर्थ ॥ ५ ॥ क्रोध सहाकारी कामासी । क्रोध आलिया काम नासी । क्रोध विवेकातें ग्रासी । तो तुजपाशीं अतिक्रोध ॥ ६ ॥ क्रोध केवळ महा मांग । जिवें मारिलें वैराग्य । सकळ योगां होय भंग । क्रोध सर्वांग अति अपवित्र ॥ ७ ॥ मातंग विटाळ जळें निवृत्ति । क्रोधाची चित्तामाजी वस्ती । त्याचे क्षाळणीं न चले युक्ती । क्रोध सर्वार्थी घातक ॥ ८ ॥ कामासी जे वश्य होती । कांहीं तरी भोग भोगिती । जे आतुडले क्रोधा हातीं । ते वृथा नागवती भोगमोक्षां ॥ ९॥ क्रोधा ऐसा वैरी । बैसला असतां जिव्हारीं । जो तयाची मानी थोरी । ते चराचरीं अति मूर्ख ॥ १० ॥ अपकारियावरी कोप करिती । कोणी कोपावरी कोप न करिती । क्रोध वाटपाडा निश्चिती । चहूं पुरुषार्थीं नागवी ॥ ११ ॥ अल्प अन्याय देखिल्यावरी । त्यावरी जो तो कोप करी । क्रोधा एवढा अपकारी । क्रोध क्रोधावरी न करिती ॥ १२ ॥ क्रोध अपराधाची थोरी । अतर्क्य रिघोनी जिव्हारीं । चहूं पुरुषार्थांची करी बोहरी । नानापरी विभांडी ॥ १३ ॥ क्रोध आलिया कडकडाटी । काम पळे उठाउठी । धर्म जाय बारा वाटीं । क्रोधें तुटी अर्थस्वार्थी ॥ १४ ॥ क्रोध कामाचा कैवारी । क्रोध अभिमानाचा सहाकारी । क्रोध लोभा सबाह्यांतरीं । पापकारी निज क्रोध ॥ १५ ॥ क्रोध संचरल्या देहीं । अणुमात्र हित नाहीं । पापाच्या कोटी पाहीं । क्रोधाच्या पायीं तोडरी ॥ १६ ॥ कोप आलिया दुर्धर । जयाचा लोपेना विचार । तोचि मोक्षाचा अधिकार । परम धीर तो एकू ॥ १७ ॥ कोपामाजी सावधान । अवतारपुरुषाचें हें चिन्ह । तें चालतें ब्रह्मज्ञान । जग पावन त्याचेनि ॥१८॥ आंगा येतां क्रोधसंग । अपवित्र होय सर्वांग । ब्रह्मचर्या होय भंग । तपा संहार होय क्रोधें ॥ १९ ॥ यज्ञ दान व्रत दक्षणा । कोप येतांचि पैं जाणा । सर्व क्रियाकर्म व्यर्थ जाणा । करी उगाणा तपाचा ॥ २० ॥ छिद्र पडतां घट गळे । क्रोधानळें तप जळे । योगी संन्यासी पडती मेळे । क्रोधें निजबळें बांधिलें पै ॥ २१ ॥ बाह्य मांगाचा विटाळू । जळमार्जनें फिटे मळू । क्रोध अतिशयें चांडाळू । नव्हे निर्मळू प्रयागीं ॥२२॥ करितां काशीवास स्नान । तंव क्रोध खवळे गहन । क्रोधा ऐसा पापी पूर्ण । नाहीं

आन संसारीं ॥ २३ ॥ क्रोध केवळ पैं मांग । क्रोधें अपवित्र पैं सर्वांग । साधिल्या कार्या केल्या भंग । क्रोधें सांग नागविलें ॥ २४ ॥ बुद्धि साधिलियापाठीं । क्रोध संचरला पोटीं । लंका जाळिली क्रोधदृष्टी । सीता गोरटी समवेता ॥ २५ ॥ क्रोधा ऐसा महावैरी । जडला असतां निज जिव्हारीं । जो ज्ञानाची मानी थोरी । तो संसारीं अतिमूर्ख ॥२६॥ क्रोध येऊं न देती दृष्टी । धन्य धन्य ते नर श्रेष्ठी । क्रोध आलिया पोटीं । ते विवेकदृष्टी निर्दोळिती ॥५७॥ ऐशिये दृष्टीचे जे नर । चैतन्याचें निजमंदिर । परब्रह्माचें भांडार । ब्रह्म साकार ते पुरुष ॥ २८ ॥ भूतीं पाहतां भगवद्भाव । कामक्रोधासी कैंचा ठाव । ऐसा ज्याचा निज सद्भाव । तोचि स्वयमेव परब्रह्म ॥२९॥ क्रोध आलिया तत्वतां । अणुमात्र न करीच स्वार्था । करविले कोटी कोटी अनर्था । जघन्यता जगनिंद्य ॥३०॥ भलत्याही क्रोधानुकारी । कोपे अल्प अन्यायमात्रीं । कोपू परम अपकारी । कोणी त्यावरी कोपेना ॥३१॥ उन्मत्त गज जेवीं मारी । त्यासी सिंह पाडी धेखरीं । परी कोपावरी कोपकरी । ऐसा संसारीं वीर नाहीं ॥ ३२ ॥ क्रोध एकला एक । चहूं पुरुषार्थी घातक । ऐक त्याचाही विवेक । दुष्ट परिपाक क्रोधाचा ॥ ३३ ॥ क्रोध येतांचि मानसीं । स्वधर्म कर्मा क्रोध त्रासी । क्रोध अर्थ स्वार्थ विध्वंसी । मोक्ष क्रोधापासीं कदा न घडे ॥३४॥ क्रोध आलिया एकांतीं । स्त्रीपुरुषां कलहो उत्पत्ति । धक्काबुक्कीमध्यें रात्री । काम विघाती मूळ क्रोधू॥३५॥क्रोध आलिया धर्मसंधीं । मुख्य ब्राह्मणांतें स्वयें निंदी । परापवादाच्या अनुवादीं । क्रोधें धर्मसिद्धि कदा न घडे ॥ ३६ ॥ क्रोध धर्मातें उच्छेदी । क्रोध धर्मातें निंदी । क्रोध पापी हा दुर्बुद्धि । निंदानुवादी जल्पोनी ॥ ३७ ॥ क्रोध पित्यातें निर्भर्त्सी । क्रोध मातेतें म्हणे दासी । क्रोध स्वधर्मातें नासी । क्रोधापासीं अधर्म ॥ ३८ ॥ बंधुबंधु अति आप्त । अर्थ स्वार्थें क्रोधाभिभूत । स्वबंधूसी हाणवी लाथ । अति अनर्थू तो क्रोधू ॥३९॥ उत्तम अर्थाची प्राप्ती । क्रोध मुख्य विश्वासघाती । अर्थापासोनि क्रोध अनर्थी । जाण निश्चिती लंकेशा ॥ ४० ॥

—भावार्थरामायण.

मोरोपंतः— गीति.

व्यास, द्रोण, विदुर, कृप, भीष्म, श्रीकृष्णनाथ, हे सुकवी ।
म्हणति, 'क्षमा शिवतरुप्रति पोषी, क्रोध सर्वथा सुकवी.' ॥ ४१ ॥
या क्रोधदस्युतिलकें कोण तपोधन जगीं नसे लुटिला? ।
बापा! विचक्षणा! तूं कैसा विश्वासलास या कुटिला? ॥ ४२ ॥
नाशी स्वसेवनकरा अन्य जनाही, म्हणोन कोपानें ।
बहु अहित होय, तैसें अहित विषाच्या म्हणों नको पानें. ॥ ४३ ॥

—यथार्थदीपिका.

वामनः— ओंव्या.

संग तोचि काम । काम तीव्र कामाचे नाम। तीव्र कामाचि धाम । क्रोधाचें॥४४॥ काम तेथें विघ्नकोटी । विघ्न होतां क्रोध पोटीं । उपजे ते वृत्ति खोटी । तमोगुणाची ॥४५॥ क्रोधें मोह उपजे। कार्य अकार्य तेव्हां न समजे। वरें वाईट कांहीं नुमजे । निजस्मृति मग कैंची? ॥ ४६ ॥ जो रागद्वेषयुक्त । तो केविं होय जीवन्मुक्त । याकारणें रागद्वेषरहित । इंद्रियसमूह ज्ञानियाचा ॥४७॥

—यथार्थदीपिका.

---

## ३९ मोह.

एकनाथः— ओंव्या.

भ्रमें श्रेष्ठत्वें ईश्वर । भ्रमें कर्म धर्म सदाचार । भ्रमें वाढला व्यवहार । भ्रममूळ संसार निजसत्य ॥ १ ॥ भ्रमबुद्धि हरपे रत्न । तें स्वबुद्धि पहातां न लभे जाण। दीपागमन होतांचि पूर्ण । सांपडे क्षण न लागतां ॥ २ ॥ सर्प लागलिया जाणा । बुद्धि पालटे तत्क्षणा । कटु मधुराचिया ज्ञाना । विवंचना कळेना ॥ ३ ॥ अत्यंत कटुनिंव कैसा । गोड म्हणूनि खाय घसघसा । गूळ टाकितां निंब जैसा । भ्रम मानसा दृढत्वें ॥ ४ ॥ भ्रम चढतां अंतःकरणीं । तेचि इंद्रिया विपरीत करणी । विषयसेवन अनुदिनीं । आणिक मनीं नाठवे ॥ ५ ॥

—भावार्थरामायण.

मोरोपंतः— गीति.

भ्रांति हिताहित न कळों दे मोहुनि मानसा, धुरी तीतें ।
दूर कराया यावी, भ्रांत न दे मान साधुरीतीतें ॥ ६ ॥

## ३६ विवेक.

शुभानंदः— ओंव्या.

कल्याण अथवा अकल्याण । यासी कारण आपुला आपण । करितां सुविवेकें वर्तन । सहज कल्याण पैं लाभे ॥ १ ॥ वर्ततां अविवेकीं प्रमादीं । त्यासी अनर्थ पदोपदीं । हें जाणती कुशळ बुद्धि । पुण्यार्थी राजे यांसारखे ॥ २ ॥

—उद्योगपर्व.

एकनाथः— ओंवी.

जो स्त्रीसवें निरत झाला । मद्यप्राशनीं निरत झाला ।
जो धनलोभें भुलला । त्याचा गेला विवेक ॥ ३ ॥

—भावार्थरामायण.

मोरोपंतः— गीति.

जी शीतागाधजळा सरिता, शिरतां निवे करी तींत, ।
निवतो प्रवेशतां जन सर्वहि तैसा विवेक रीतींत. ॥ ४ ॥
हळुहळु झडो अहंता, सन्नमनीं वार्धकीं जशी शेंडी; ।
केंडू विवेक विषया, निस्पृह जन वस्तुतें जसा केंडी. ॥ ५ ॥

—स्फुट.

वामनः— श्लोक.

कर्मानुसार घडते मति सर्व लोकां, ।
कर्माअधीन फल तेथ, तसेच शंका ।
हें सत्य यद्यपि, तरी असतां विवेकें, ।
होणार हो मग सुखें निजकर्मपाकें. ॥ ६ ॥

खोटें बरें कार्य असो, तयाचा ।
विचारिजे कीं परिमाण साचा; ।
कर्तव्य कीं जें विबुधें विवेकें ।
तें अन्यथा शल्य घडे विपाकें. ॥ ७ ॥

—स्फुट.

---

## ३७ पराक्रम.

श्रीधरः— ओंव्या.

दृष्टीस न भरे केसरी । परी क्षणें गज विदारी । वज्र धाकुटें परी । चूर्ण करी सकळ नगाचें ॥ १ ॥ खुजट दिसे वामन । परी ढेंगांत आटी त्रिभुवन । घटोद्भवाची तनु सान । परी सागर समग्र प्राशिला ॥२॥ चिमणा दिसे चंडांश । परी सकळ सृष्टीं करी प्रकाश । तेंवी नरवीर राघवेश । त्याचा दास मी असें ॥ ३ ॥

—रामविजय.

सूर्य काय मुष्टींत झांके । चंद्र न लपे कदा कांखे । ऐरावत शक्राचा देखें । लपेल कैसा पर्णकुटीं ॥ ४ ॥ सिंधु न माये रांजणीं । बोचक्यांत लपेल कदा अग्नी । मेरु कांखेसी घालुनी । कोणा लपवे सांग पां ॥ ५ ॥ मूर्खांमाजी पंडित । अभाग्यांत श्रीमंत । क्लीबांमाजी प्रतापवंत । शूर कैसा झांके पां ॥ ६ ॥ लवणाचा घट थोर । आवरूं न शके गंगापूर । वानरांमाजी रघुवीर । कदाकाळीं झांकेना ॥ ७ ॥ भूतांमाजी शंकर । किरडांमाजी धरणीधर । रंकांमाजी राजेंद्र । कदा झांकिला जाइना ॥ ८ ॥ कस्तुरी चोरिली चोरें । परी परिमळें हाट भरे । तैसा कृष्ण न झांके हो सुंदरे । लपवितां कोठेंही ॥ ९ ॥

—हरिविजय.

पहा दीपककळा असे केव्हडी । परी अंधकाराचीं नगरें मोडी । लघुवज्र परी आपुले प्रौढी । कडेचि पाडी पर्वताचे ॥ १० ॥ पहा केव्हडा सिंहनंदन । उपजतांचि करी गजविदारण । कीं गंगा बिंदुप्राशन । करितां नाशी पातककोडी

॥ ११ ॥ नातरी केव्हडा अंकुश । स्थूळदेहासी करी कासावीस । म्हणोनि तेजस्वी पुरुष । नसे वयाची अपेक्षा ॥ १२ ॥ अग्निस्फुलिंग केव्हडा । परी क्षणमात्रें जाळी तृणहुडा । म्हणोनि स्थूळ नसे तो गाढा । जो तेजस्वी तोचि थोर ॥ १३ ॥ जरी मातली जंबुकावळी । तरी केसरीपुढें ती काय बळी । नातरी उबगलिया अंशुमाळी । काय तिमिरें भांडती ॥ १४ ॥

—जै. अश्वमेध.

**मुक्तेश्वरः—** **ओंव्या.**

मार्जारपिलींया ऐसें कांखें । कुंजर बाळ कैसेनि झांके ।
अंधकारीं पळतां अर्के । लोकदृष्टी न लोपे ॥ १५ ॥

—विराटपर्व.

**एकनाथः—** **ओंव्या.**

अहंकामादिक राक्षस । मारोनि पावला जो यश । सुरवर पूजिती जयास । तोचि एक पुरुषार्थी ॥ १६ ॥ लोकलज्जेसी भिवोनि । ममता योषितेसि सांडिली ज्यांनीं । ये जनीं वनीं त्रिभुवनीं । तोचि एक पुरुषार्थी ॥ १७ ॥ सर्व कर्मी कुशळपण । समता दया सेवी जयाची आंगवण । जया अहंममता नाहीं जाण । तोचि एक पुरुषार्थी ॥ १८ ॥ सद्गुरुवचनीं दृढभाव । गुरु म्हणे ऐसा नि:संदेह । म्हणोनि भजनीं जयाचा उत्सव । तोचि एक पुरुषार्थी ॥ १९ ॥ गृहकृत्यीं उदासभूत । तयांत असोनि जो अलिप्त । कामिनीकामातें नातळत । तोचि एक पुरुषार्थी ॥ २० ॥ स्वयें न बोले वाटिवेसी । शत्रुनिर्दाळणीं उल्हास मानसीं । आपपर नेणे रणभूमीसी । तोचि एक पुरुषार्थी ॥ २१ ॥ क्षात्रधर्मी निधडा पूर्ण । तृणप्राय देखे निजजीवन । रिपु निर्दाळी थोरसान । न म्हणे तोचि पुरुषार्थी ॥ २२ ॥ सर्व भूतीं दया पूर्ण । स्वकर्माविषयीं सावधान । गुरुभजनीं उदित मन । तोचि एक पुरुषार्थी ॥ २३ ॥ जो न सांडी निज-धर्मासी । स्वामिकाजीं नव्हे आळसी । मातृपितृभक्ति जयासी । तोचि एक पुरुषार्थी ॥ २४ ॥ बहुसाल मिळती खद्योत । तरी न जिंकवे रवि एक । मार्जार काय व्याघ्रा सन्मुख । ठाण मांडोनि राहेल ॥ २५ ॥ पतंग आपुले

प्रभेकरून । काय गिळूं शकेल हुताशन । पहा हो धेनूचा नंदन । मदगजेंसीं भिडेल ॥ २६ ॥ कद्रूतनय बहुतेक । वैनतातनय एकाएक । त्यातें काय ते मशक । पराभवितील संग्रामीं ॥ २७ ॥ कमलमृणालाचेनि तंतें । केविं बांधवेल मातंगातें । कटिभंग आळिकेचेनि सूत्रें । केविं मेरु वेंघवेल ॥ २८ ॥ धेनूचें वत्स निजशृंगें करी । जे हिंमालयाचें हृदय विदारी । मशक सागरा प्राशन करी । हें कैसेनि घडों शके ॥ २९ ॥ महा अंधाचेनि निजपुत्रें । भेदिजे पिपीलिकेचे नेत्र । चरणविहीन पर्वत-। मस्तका केविं वळंघेल ॥ ३० ॥

—भा. रामायण.

**महीपतिः—** **ओंव्या.**

तापसांमाजी कैलासनाथ । कीं पक्षियांमाजी विनतासुत । ना तरी देवांमाजी शचीनाथ । न लोपेचि सर्वथा ॥ ३१ ॥ मृत्तिकेमाजी कस्तुरी । कीं वृक्षांमाजी मैलागिरी । कीं श्वापदांमाजी गजकेसरी । न झांकेचि सर्वथा ॥ ३२ ॥

—भक्तिविजय.

**वामनः—** **श्लोक.**

तें श्वान एक तुकड्यास्तव चार नाना ।
दावी धन्यास जठरार्थ कसे पहाना; ।
दे आळवूनि जरि हस्तिप 'बाप, भाई,' ।
घेतोचि घांस गजराज, कशी बढाई! ॥ ३३ ॥
सिंहाचा जो बाल, तोही चपेटा ।
मारी त्याला, जो करी मत्त मोठा, ।
तेजस्वी जे वृत्ति ऐशीच त्यांची, ।
तेथें नाहीं चाड कांहीं वयाची ॥ ३४ ॥

—नीतिशतक.

## ३८ सत्य.

मुक्तेश्वरः—

ओंव्या.

कोटी पुण्यें जोडिलीं यत्नीं । तीं जळती एके असत्य वचनीं ॥ जैसी पावक-स्फुलिंगकणी । नाशी कर्पूरगिरीतें ॥ १ ॥ सत्यापरता नाहीं धर्म । सत्य तेंचि परब्रह्म । सत्यापाशीं पुरुषोत्तम । सर्वकाळ तिष्ठत ॥ २ ॥ सत्यें नेमिला न चळे नेम । त्यासि वोळगे मोक्षधाम ॥ घोर संसारभयाचें नाम । स्पर्शों न शके कल्पांतीं ॥ ३ ॥ असत्य तेंचि पैं पातक । असत्य तोंचि महानरक । असत्याचेनि संगें दुःख । अनंत जन्मीं भोगिती ॥ ४ ॥ सत्यामृताची कनकवाटी । जोडिली न संडे भूतटीं । असत्यविषाची नरोटी । पवित्र हातें नातळे ॥ ५ ॥

—आदिपर्व.

सत्य सन्मार्गी वर्ततां नर । त्याचा कैवारी जगदीश्वर ॥
त्याचें कार्य शार्ङ्गधर । आपण आंगें संपादी ॥ ६ ॥

—सभापर्व.

श्रीधरः—

ओंव्या.

आपलें वचन करावया खरें । राज्य दिधलें हरिश्चंद्रें । स्त्रीपुत्र विकोनियां त्वरें । ब्रह्मस्व तेणें फेडिलें ॥ ७ ॥ दशरथें सत्य केलें वचन । श्रीरामासारिखें पुत्र-निधान । वनासि धाडिलें तेणें जाण । हरिख झाला कैकयीसी ॥ ८ ॥ हरिश्चंद्र अंत्यजभृत्य झाला आपण । सदा रक्षिलें स्मशान । मृततनयांगवस्त्रहरण । करोनि सत्व रक्षिलें ॥९॥ सत्व रक्षिलें त्या श्रियाळें । पुत्रा मारोनियां पचविलें । अतिथीलागीं भोजना दिधलें । आपुले सत्वाकारणें ॥ १० ॥ पहा शिबी राजा चक्रवर्ती । तेणें स्वमांस छेदोनियां हातीं । ससाण्यासी केली तृप्ती । परी सत्व-स्थिती राखिली ॥ ११ ॥ असत्या वादियाचे घरीं । सर्वथा न रहावें क्षण-भरी । दुर्वासना उपजे अंतरीं । येथें संदेह असेना ॥ १२ ॥ प्रतिज्ञा जे करिती सत्य । तयांचें असे धन्य जीवित । जे कीर्तनरंगीं नाचत । स्वर्ग त्यांतें तृणप्राय ॥ १३ ॥

—जै० अश्वमेध.

शुभानंदः— **ऑव्या.**

सत्यापाशीं तिष्ठती हरिहर । सत्यें तरिजे भवसमुद्र । सत्यें चाले हें चराचर । सत्यें भूतें पृथ्वी वाहे ॥ १४ ॥ सत्यें वर्षे हें जीवन । सत्यें यज्ञ करी पचन । सत्यें विचरें महापावन । सत्यें आकाश हें उभें ॥१५॥ सत्यापरता नाहीं देवो । सत्याविणें स्वर्ग वावो । सत्यापाशीं वासुदेवो । सेवा करी निजांगें ॥ १६ ॥ शिबि श्रियाळ हरिश्चंद्र नृपती । यांची पुराणीं वर्णिली कीर्ति । सत्य रक्षोनियां मुक्ति । निज सामर्थ्यें पावले ॥ १७ ॥ सत्यें वर्ततां तो अनंत । सर्वथा नुपेक्षी कमळाकांत । हिरण्यकश्यपें मारितां प्रऱ्हाद भक्त । लीलाविग्रहें रक्षिला ॥१८॥ दैत्य मारूं जातां सुता । मृत्यु आला दैत्यनाथा । सुग्रीवातें मारूं जातां । वाळी प्राणें निमाला ॥ १९ ॥ चरणीं हाणितां रावण । झाला चिरंजीवी बिभीषण । सत्यवंतातें नारायण । पदोपदीं रक्षित ॥ २० ॥ सत्य स्वधर्म रक्षणें । प्राणी परपार पाविजे पंथें तेणें । संजया! भूतसृष्टि एके एणें । सत्यापासोनि चालतसे ॥२१॥ सत्यें उभें स्तंभाविण गगन । सत्यापसाव वावरे पवन ॥ होतसे रात्रिदिन । सत्यापासोनि संजया ॥ २२ ॥ सत्यापासोनि हिंडे सविता । चंद्रें औषधीसी अमृतता ॥ सत्यापासोनि दाहकता । अग्निकर्म हें चाले ॥ २३ ॥ सत्यापासोनि सर्वभार । पृथ्वी वाहे हें सचराचर ॥ सत्यापासोनि जलधर । मेघमाळा मोकळी ॥ २४ ॥ सत्याचेंचि समर्थ बळ । सत्य रक्षोनि झाले देव सकळ । प्राप्त झालीं पदें अढळ । सत्यापासोनि संजया ॥ २५ ॥ शीतोष्ण सुखदुःख साहोन । सत्यें-करोनि विषयवारण । सत्यें करोनि इंद्रियें बंधन । सत्यें ब्रह्म पाविजे ॥ २६ ॥ सत्येंकरूनि अंतराळीं । भ्रमती नक्षत्रें महामाळी ॥ रुद्रादित्य वसु मंडळीं । विश्वदेवादिक हे ॥ २७ ॥

—उद्योगपर्व.

